शरत्-साहित्य माला-१२

# विराज-वहिनी

[ डॉ. शरच्चंद्र चतर्जींच्या 'विराज-बौ' या मूळ बंगाली कादंबरीवरून ]

: अनुवादक :

भा. वि. वरेरकर

: प्रकाशक :

नवभारत प्रकाशन संस्था, मुंबई, ४

# प्रस्तावना

प्रस्तुत कादंबरी ही शरद्बाबूंच्या अगदीं पहिल्या अमदानींतील कादंबऱ्यांपैकीं एक प्रमुख कादंबरी आहे. त्यांच्या हातून निघालेल्या पुढील कादंबऱ्यांशीं तुलना करतां चोखंदळ टीकाकाराला या कथेंत वैगुण्यें शोधून काढतां येतील. असें असलें तरीही वंगभाषेंतील या कादंबरीचें अग्रस्थान मात्र आज इतकीं वर्षे होऊन गेल्यावरही अढळ राहिलें आहे.

प्रस्तुत कथेचें मूळ बंगाली नांव "विराज बौ" असें आहे. शुद्धलेखनाच्या दृष्टीनें हा शब्द "वऊ" असा पाहिजे. पण ज्या काळांत उच्चारानुसार लेखन करण्याची प्रथा बंगाल्यांत सुरू झाली त्या काळांतच ही कथा लिहिली गेल्या वेळीं "बौ" हा शब्द वापरण्यांत आला होता आणि त्यामुळें जुन्या शुद्ध-लेखनाच्या अभिमानी टीकाकारांनीं टीकाही केली होती.

"बौ" हें संस्कृत 'वधु' शब्दाचें वंगीय स्वरूप आहे. हिंदींत 'बहू' व गुजरातींत 'वहू' असे शब्द प्रचारांत आहेत. तसाच शब्द मराठींत प्रचा-रांत नसला तरी 'वहिनी' हें या 'बौ' शब्दाचें मराठी स्वरूप असावें असें वाटल्यावरून भाषांतर करतांना तोच पर्याय वापरण्यांत आला आहे.

बंगाली भाषेंत "बौ" शब्दाचा मुख्यार्थ 'सूनबाई' असा असला. तरी तो 'वहिनी' या मराठी भाषेंतील शब्दाच्या अर्थीही वापरला जातो. बहुधा 'वहिनी' या अर्थी 'बौ-दिदी' (सून-आक्का) हा शब्द विशेष प्रचारांत आहे. प्रस्तुत कथेंत बौ हा शब्द सून आणि वहिनी या दोन्ही अर्थीं वापरला गेला असल्यामुळें मराठी भाषांतर करतांनाही हा भेद तसाच राखण्यांत आला आहे.

प्रस्तुत कथा आजच्या वाचकाला सनातनी स्वरूपाची वाटेल. तशी ती आहेच. पण ही कथा लिहितांना भविष्यकालीन परिस्थितीच्या प्रचारापेक्षां तत्कालीन समाजाचें प्रत्यक्ष ऐतिहासिक स्वरूप दाखवण्याचा लेखकाचा उद्देश होता हें ध्यानांत घेतलें, म्हणजे आधुनिक वाचकाचा गैरसमच सहज दूर होईल. अगदीं आजच्या काळांत सुद्धां सामाजिक आचारविचारांत महाराष्ट्राच्या दृष्टीनें बंगाल मागासलेला आहे. जें निर्भय पुरोगामीत्व मराठी कथावाङ्मयांत निदर्शित करण्यांत आलें आहे, तेवढें वंगवाङ्मयांत क्वचितच आढळेल. पुरो-गामित्वाची ही मर्यादा ज्या प्रमाणांत महाराष्ट्राकडून ओलांडण्यांत आली

आहे, त्या अमर्याद स्वरूपाची संवय झालेल्या वाचकांनीं भावनात्मक वंग-कुटुंबाचा इतिहास पुराण्या नजरेनें पहाणेंच पथ्यकर होईल.

प्रस्तुत कथेंत करुणरसाची जी कमालमर्यादा गांठली आहे ती वास्तवतेच्या दृष्टीनें कित्येकांना अवास्तव ( Melo-dramatic ) वाटण्याचा संभव आहे. सनातनीत्वाची परमावधी असलेल्या ग्रामीण कुटुंबाची वंगदेशांतील परिस्थिति ज्यांच्या परिचयाची आहे, त्यांना मात्र हा करुणरस अवास्तव वाटणार नाहीं—किंबहुना अमर्याद सनातनी वृत्तीच्या परिपाकांतूनच ही दुःखान्तिकेची कमाल-मर्यादा गांठली गेली आहे असें दिसून येईल.

कुटुंबांतील दीर-भावजय, जावा-जावा, नणंदा-भावजया यांच्या वास्तव-संबंधांपेक्षां आदर्श संबंधांचीं चित्रेंच कथावाङ्मयांत रंगविण्याची प्रथा बंकिम-चंद्र चट्टोपाध्याय यांच्या कालापासून वंगवाङ्मयांत सुरू झाली. त्या प्रथेला अनुसरून प्रस्तुत कादंबरींतील व्यक्तींचीं चरित्रें निर्माण झालीं आहेत असें वाङ्मयाचा तुलनात्मक अभ्यास करणाऱ्यांना दिसून येईल.

परदेशी भाषेंतील ग्रंथाचें भाषांतर भारतीय भाषेंत करतांना अनुवादकाला भाषासाम्याचें बंधन नसतें—तो अनुवाद स्वैर होऊं शकतो; पण—कोणत्याही भारतीय भाषेंतील अधिकारी ग्रंथकाराच्या ग्रंथांचें भाषांतर दुसऱ्या कोणत्याही भारतीय भाषेंत करतांना, मूळ लेखकाच्या वाक्यरचनेची भाषांतर करतांना विकृति होऊं न देणें ही अनुवादकावरची पहिली जबाबदारी असते. ती जबाबदारी पार पाडतांना अशा भाषांतरांत व्यंग येणें अपरिहार्य असतें. म्हणूनच बऱ्याच जुन्या काळीं लिहिलेल्या प्रस्तुत कथेसारख्या ग्रंथांत, मूळ लेखकाच्या विचार-सरणीला लेखनसरणीमुळें कुठेंही विकृति न येण्यासाठीं, क्वचित वंगीय लेखन-सरणीचेंही अनुकरण करणें अवश्य झालें आहे, असें चोखंदळ टीकाकाराला दिसून येईल.

हाजीकासम वाडी,
मुंबई, २९-९-४३.

भा. वि. वरेरकर.

# १

हुगळी जिल्ह्यांतील सप्तग्रामांत नीलांबर आणि पीतांबर चक्रवर्ती या नांवाचे दोन भाऊ रहात होते. मढीं जाळण्यांत, भजन करण्यांत, खोल वाजवण्यांत आणि गांजा पीण्यांत नीलांबरचा हात धरणारा एकही माणूस या पंचक्रोशींत नव्हता. त्याच्या गोऱ्या गोमट्या शरीरांत बेफाम ताकत होती. एक परोपकारी माणूस म्हणून त्याची जेवढी ख्याती होती तेवढीच एक मवाली म्हणूनही त्याची प्रसिद्धी होती.

पण त्याचा छोटा भाऊ पीतांबर मात्र अगदींच निराळ्या वृत्तीचा माणूस होता. तो जितका ठेंगणा होता तितकाच हाडकुळाही होता. माणूस मेल्याची बातमी कळली तर संध्याकाळानंतर त्याच्या सर्वांगांत झिणझिण्या उठत. आपल्या दादासारखा तो मूर्ख नव्हता. मवालीगिरीचा टेंभा मिरवून तो वागत नव्हता. सकाळींच उठून घांसभर भात खाऊन, दप्तर बगलेला मारून हुगळीच्या अदालतींत तो जात असे. तिथल्या पश्चिमेकडल्या एका झाडाखालीं तो बैठक मारून बसे आणि सारा दिवस अर्ज लिहून जें कांहीं मिळवीत असे तें संध्याकाळ होण्यापूर्वीं घरीं येऊन पेटींत बंद करून ठेवीत असे. घराचे दरवाजे खिडक्या रात्रीं तो स्वतः बंद करी आणि बायकोला सांगून पुनः पुनः एकदां नीट पारखून घेई तेव्हांच झोंपायला जाई.

आज सकाळीं नीलांबर चंडीमंडपाच्या एका बाजूला बसून गुडगुडी ओढीत होता. त्याची छोटी बहीण हरिमती तितक्यांत तिथें आली आणि कांहीं न बोलतां त्याच्या पाठीवर गुडघे टेंकून बसून मानेंत तोंड खुपसून रडूं लागली.

गुडगुडी भिंतीला टेंकून बाजूला ठेवून देऊन एक हात आपल्या वहिणीच्या माथ्यावर ठेवीत तो मोठ्या मायाळूपणानें म्हणाला, " सकाळींच रडते आहेस कां ताई ? "

हरिमतीनें त्याच्या पाठीवर तोंड घांसतांना डोळ्यांतलें पाणी पाठभर माखीत माखीत म्हटलें, " वहिनीनं माझे गालगुच्चे घेतले. अन आंधळी म्हणून मला शिवी दिली. "

नीलांबर हंसून म्हणाला, " तुला आंधळी म्हटलं ? असले दोन सुंदर डोळे असतांना जी तुला आंधळी म्हणते तीच आंधळी ! पण गालगुच्चे कां घेतले ? "

रडत रडत हरिमती म्हणाली, " उगीचच. "

" उगीचच ? ठीक, ये पाहूं माझ्याबरोबर—" असें म्हणून बहिणीचा हात धरून तो आंत आला आणि त्यानें हांक मारली—" विराज वहिनी,—"

मोठ्या सुनबाईचें नांव विराज असें होतें. नवव्या वर्षींच ती लग्न होऊन सासरीं आली म्हणून तिला सारे विराजवहिनी म्हणून हांक मारीत. आतां तिचें वय एकोणीस वीस वर्षाचें होतें. सासूबाईच्या मृत्यूनंतर तीच आतां घरची मालकीण झाली होती.

विराज असामान्य सुंदर होती. चारपांच वर्षांपूर्वी तिला एक मुलगा झाला होता पण जन्मतांच तो मेला. त्यानंतर तिला मूलबाळ कांहीं झालें नाहीं.

ती स्वैंपाकघरांत कामांत गुंतलेली होती. नवऱ्याची हांक ऐकून बाहेर आली, तेव्हां वहिणभावांना हातांत हात घालून येतांना पाहून चवताळून उठून म्हणाली, " जळलं मेलीचं तोंड, पुन्हां गेलीस वाटतं तक्रार करायला ? "

नीलांबर म्हणाला, " कशी जाणार नाहीं ? तूं तिला आंधळी म्हटलंस ! बरं म्हटलंस तें म्हटलंस—रागानं म्हटलंस—पण तिचे गालगुच्चे कां घेतलेस ? "

विराज म्हणाली, " एवढी मोठी घोडी ही—बिछान्यांतू उठली—तोंडसुद्धां धुतलं नाहीं, कपडे बदलले नाहींत, तोंच गोठ्यांत गेली आणि वासरूं सोडून देऊन हें एवढं तोंड उघडून बघत बसली. एक थेंब सुद्धां दूध मिळालं नाहीं आज. बदवलंच पाहिजे होतं हिला ! "

नीलांबर म्हणाला, " नाहीं,—मोलकरणीला गवळवाड्यांत पाठवलं पाहिजे

होतं. पण हं पहा ताई, तूं वासरूं सोडून द्यायला गेलीस कशाला ? तें कांहीं तुझं काम नव्हतं."

दादाच्या मागे लपून हरिमती हळूच म्हणाली, "मला वाटलं, दूध गिळून झालं."

"आणखी काय काय वाटलं तुला ?" असें म्हणत विराज स्वयंपाक घरांत जात होती तोंच नीलांबर हंसून म्हणाला, "तूं एवढीच होतीस त्यावेळीं तूं सुद्धां असंच एके दिवशीं आईच्या पिंजऱ्यांतलं पांखरूं उडवून दिलं होतंस. पिंजऱ्याचं दार उघडं ठेवलं तरी पिंजऱ्यांतलं पांखरूं उडून जायचं नाहीं असं तुला वाटलं होतं. आठवतं ?"

विराज थांबून मागें वळली आणि हंसतमुखानें म्हणाली, "पण तेव्हां मी एवढी नव्हतें—" असें म्हणून ती आपल्या कामाला लागली.

हरिमती म्हणाली, "चल ना दादा, बागेंत जाऊं. आंबे पिकले आहेत कीं नाहीं तें एकदां पाहूं."

"चल तर ताई."

घरचा गडी यदू आंत येऊन म्हणाला, "नारायण ठाकूर येऊन बसले आहेत."

नीलांबर जरासा ओशाळून हळूच म्हणाला, "इतक्यांत येऊन बसले का !"

स्वेंपाकघरांत काम करीत बसलेल्या विराजच्या कानीं ते शब्द गेले. ती धांवतच बाहेर आली आणि किंचाळून म्हणाली, "निघून जा म्हणावं त्या म्हाताऱ्याला,"—नवऱ्याकडे वळून ती म्हणाली, "सकाळींच उठल्याबरोबर जर ही सुरवात करायची असेल तर मी डोकं आपटून जीव देईन. आज झालंय काय तुम्हाला ?"

नीलांबरनें उत्तर दिलें नाहीं. बहिणीचा हात धरून तो मुकाट्यानें बाहेर पडला आणि बागेकडे वळला.

या बागेच्या एका बाजूला सरस्वती नदीचा निमूळता प्रवाह, गंगेच्या यात्रेला निघालेल्या यात्रेकरूंच्या श्वासप्रश्वासासारखा बाहेर पडून, वहात होता. पाण्यावर शेवाळ जमलें होतें. मधून मधून गांवचे लोक घरकामाला लागणाऱ्या पाण्यासाठीं नदींत डबरे खणून ठेवीत असत. त्यांच्या आजूबाजूला असणाऱ्या, शेवाळानें झांकलेल्या गुडघाभर पाण्याच्या खालून दिसणाऱ्या शिंपावर, तेवढ्याच स्वच्छ पाण्यामधून सूर्याचे जे किरण पडत त्यामुळें पाण्यांत हिरेमाणकें

चमकताहेत कीं काय असा भास होई. नदीच्या तीरावर असलेल्या एका काळ्या खडकाशेजारीं, केव्हां तरी बांधल्या गेलेल्या एका समाधीच्या मोडक्या भिंती, केव्हां तरी आलेल्या पावसाळ्यांतल्या पुरामुळें कोसळून पडत असलेल्या दिसून येत होत्या. शेजारच्या बायका रोज संध्याकाळीं मृतात्म्याला उद्देशून इथें पणती पेटवून ठेवीत असत. हातीं धाकट्या बहिणीला घेऊन नीलांबर याच खडकाच्या एका बाजूला येऊन बसला.

नदीच्या दोन्ही कांठाला मोठ्या मोठ्या आंबराया आणि वेळूंचीं बेटें होतीं. एक-दोन जुनाट पिंपळ आणि वड नदीच्यावर झुकले होते. त्यांच्या पारंब्या एकमेकांत मिळून गेलेल्या दिसत होत्या. त्यांच्या फांद्यांवर केव्हांपासून किती पक्षांनीं सुश्रांत-पणें आपलीं घरटीं बांधलीं होतीं, किती पिलें मोठीं होऊन गेलीं होतीं, त्यांनी किती फळें खाल्लीं होतीं आणि किती गाणीं गायिलीं होतीं त्याला अंतच नव्हता. तीं बहिण भावंडें या वृक्षाच्या छायेखालीं कांहीं वेळ मुकाट्यानें बसलीं होतीं.

एकाएकीं हरिमती दादाला येऊन बिलगली आणि म्हणाली, " असं पहा दादा, वहिनी तुला वैष्णवठाकूर का म्हणते ? "

गळ्यांतली तुळशीची माळ दाखवीत नीलांबर हंसून म्हणाला, " मी वैष्णव आहें म्हणूनच वैष्णव म्हणते ती मला. "

हरिमतीला तें पटलें नाहीं. ती म्हणाली, " वाः ! तूं वैष्णव कसा ? ते तर भिक्षा मागतात. बरं, मला सांग, कां बरं ते भिक्षा मागतात दादा ? "

" त्यांच्याकडे कांहीं नसतं म्हणून ! " दादाच्या चेहऱ्याकडे टक लावून पहात हरिमतीनें विचारलें," कांहीं नाहीं त्यांच्याकडे ? तळं नाहीं ? बाग नाहीं ? धान्याचे कुणगे नाहींत ?—कांहींच नाहीं ? "—

बहिणीच्या माथ्यावरच्या केसांतून मोठ्या वात्सल्यानें हात फिरवीत तिचे केस विस्कटून टाकतांना नीलांबर म्हणाला, कांहीं सुद्धां नाहीं बरं—ताई—कांहीं सुद्धां नाहीं !—वैष्णवानें कसलाच संग्रह करायचा नाहीं ! "

हरिमती म्हणाली, " तर मग सारे लोक त्यांना कांहीं ना कांहीं देत कां नाहींत ? "

नीलांबर म्हणाला, " तुझा दादा तरी त्यांना कांहीं देतो आहे का ? "

" कां देत नाहींस दादा ? एवढं आहे ना आपल्याकडे ? "

नीलांबर हंसून म्हणाला, " आहे खरं—पण कांहीं देतां येत नाहीं तुझ्या दादाला ! आतां तूं राजाची राणी झालीस म्हणजे दे काय द्यायचं तें. "

हरिमती इवलीशी मुलगी होती, तरीही त्या भाषणानं लाजली. दादाच्या बगलेंत तोंड खुपसून म्हणाली, " जाऽ ! "

तिला दोन्ही हातांनीं कवटाळून नीलांबरनं तिच्या मस्तकाचं चुंबन घेतलं. आईबाप नसलेल्या या छोट्या बहिणीवर त्याचं जें प्रेम होतं त्याला सीमाच नव्हती. तीन वर्षांच्या त्या बछडीला सून-मुलाच्या हातीं सोपवून देऊन त्याची विधवा आई सात वर्षांपूर्वीं स्वर्गस्थ झाली होती. तेव्हांपासून नीलांबरनेंच तिला लहानाची मोठी केली. गांवच्या साऱ्या रोग्यांची तो सेवा करीत होता, प्रेतं भाजीत होता, भजनं करीत होता, गांजा पीत होता, पण आईचा हा शेवटचा आदेश त्यानं एक क्षणभरसुद्धां फेंटाळला नाहीं. अशा रीतीनं उराशीं कवटाळून हरिमतीला त्यानं वाढवली होती—आईची जागा त्यानं घेतली होती—म्हणून ती एवढ्या मोकळ्या मनानं दादाच्या खांद्यावर मान टाकून उगीच राहिली.

दुरून कुठून तरी म्हाताऱ्या दाईची हांक ऐकूं आली. " छोटे, सूनबाई तुला दूध प्यायला बोलावताहेत. "

हरिमतीनं वर पाहिलं आणि काकुळतवाणीनं दादाला म्हटलं, " तूं सांग ना दादा, आतां दूध नको आहे म्हणून. "

" दूध कां नको ताई ? "

हरिमती म्हणाली, " अजून मला भूकच लागली नाहीं मुळीं. "

नीलांबर हंसून म्हणाला, " तें मला कळलं. पण जी गालगुच्चे घेते तिला तें कळायचं नाहीं ना ? "

पुनः आतून दाईनं हांक मारली, " छोटे,—"

नीलांबरनं तिला बळेंबळेंच उठवलं आणि म्हटलं, " जा बाळ, कपडे बदलून दूध पिऊन ये. मी इथंच बसतों आहें. "

वांकडें तोंड करून हरिमती कशीबशी तिथून निघून गेली.

त्या दिवशीं दुपारीं नवऱ्याला भात वाढून विजया येऊन जवळ बसली आणि म्हणाली, " बरं, आतां तुम्हीच सांगा—काय म्हणून रोज रोज मी तुमच्या पानांत हे जिन्नस वाढतें ? तुम्ही हें खात नाहीं—तें खात नाहीं—तें चालत नाहीं—आतां शेवटीं तुम्ही मासे खायचं देखील सोडलं—"

पाटावर बसत नीलांबर म्हणाला, "हो तर ! ही एवढी शाकभाजी आहे ना ?"

"ही एवढी म्हणे ! थोडं असलं कीं जास्त वाटतं आणि जास्त असलं की थोडं म्हणायचं—अशानं का पुरुष माणसाचं जेवण होतं ? हवा तो जिन्नस मिळायला हें कांहीं शहर नाहीं. बोलून चालून हें खेडेगांव. इथं जेवायला आधार म्हणजे मागीलदारच्या तळ्यांतले मासे—ते सुद्धां आतां तुम्ही खात नाहीं !"

"छोटे !—कुठं गेली ही ?—पंखा घेऊन वारा घाल ना. आतां सांगतें, तें चालायचं नाहीं. पानांत एवढासुद्धां भात जर शिल्लक राहिला तर तुमच्या पाया-जवळ डोकं आपटून जीव देईन."

हंसतमुखानें नीलांबर मुकाट्यानें जेवूं लागला.

रागारागानें विराज म्हणाली, "बरं हंसायला येतं—इथं माझ्या अंगाचा भडका उडाला आहे. एक एक दिवस तुमचं जेवण तुटत चाललंय त्याचा पत्ता आहे का तुम्हाला ? गळ्याचीं हाडं बाहेर दिसूं लागली आहेत—इकडे गेली आहे का कधीं नजर ?"

नीलांबर म्हणाला, "पाहिलं आहे. हा सारा भ्रम आहे तुझा "

विराज म्हणाली, "माझा भ्रम का ? भातांतलं एक शीत कमी गेलं तुमच्या पोटांत, तर सुद्धां तें मला कळतं आणि रति रति करून तुम्ही वाळत चालला आहांत तें अंगाला हात लावून देखील मला कळत नाहीं का ? जा—ग—छोटे ठेव तो पंखा तिथं—स्वयंपाकघरांतून तुझ्या दादाचं दूध घेऊन ये."

हातीं पंखा घेऊन हरिमती वारा घालायला सुरवात करीत होती. पंखा खालीं ठेऊन ती दूध आणायला गेली.

विराज पुनः म्हणाली, "धर्मकर्म करायला अजून फार अवकाश आहे. आज ती तिकडची आत्याबाई आली होती. तिनं ऐकलं त्यावेळीं ती म्हणाली, 'या वयांत मासे खाणं बंद केलं तर डोळ्यांतला तजेला कमी होतो. अंगांतली ताकद कमी होते—नाहीं. नाहीं. तें चालायचं नाहीं. एक करतांना शेवटीं एक व्हायचं. मी कांहीं तुम्हाला मासे बंद करूं द्यायची नाहीं."

नीलांबर हंसत सुटला. तो म्हणाला, "माझ्या वाट्याचं तूं आणखी जास्त खात जा—म्हणजे होईल सारं ठीक ठाक !"

रागाला येऊन विराज म्हणाली, "कुणबी शूद्रांसारखं तूं मी करूं लागलांत का ?"

नीलांबर ओशाळून म्हणाला, "हें बघ, तें ध्यानांतच रहात नाहीं पहिल्यापासून जडलेली संवय सहसा जात नाहीं. किती वेळ तुझे कान पिळले आहेत तें आहे ना ध्यानांत ?"

गालांतल्या गालांत हंसत विराज म्हणाली, "ध्यानांत आहे का म्हणे ! लहानशी मिळालें होतें—म्हणून तुम्ही कांहीं कमी सतावलं नाही मला. बाबांना नकळत आईला नकळत माझ्याकरवीं चिलीम भरून घेत होतां—तसे कांहीं कमी सैतान होतां का तुम्ही ?"

नीलांबर हो हो करीत हांसत सुटला. म्हणाला, "अजून सुद्धां तें आठवतं ना तुला ? पण असं पहा, तेव्हांपासूनच मी तुझ्यावर बेहद्द खूष होतों."

ओंठावरचं हसूं दाबीत विराज म्हणाली, "माहीत आहे—आतां बसा उगीच. छोटी येते आहे."

दुधाची वाटी पानाजवळ ठेवून देऊन हरिमती पंखा घेऊन वारा घालूं लागली. विराज हात धुऊन आली आणि नवऱ्याच्या अगदीं जवळ येऊन बसून म्हणाली, "तो पंखा माझ्याकडे दे छोटे आणि तूं जा खेळायला."

छोटी निघून गेल्यावर पंखा हातीं घेऊन वारा घालीत घालीत विराज म्हणाली, "खरंच,—एवढ्या लहान वयांत लग्न होणं कांहीं बरं नव्हे—नाहीं ?"

नीलांबरनं विचारलं, "कां नाहीं ? मी तर म्हणतों, कीं लग्नांत मुलगी जेवढी लहान असेल तेवढं बरं—"

मान वेळावीत विराज म्हणाली, "नाहीं—माझी गोष्ट सोडून द्या. भाग्य माझं कीं मीं तुमच्या पदरीं पडलें. शिवाय मला छळायला दुष्ट चांडाळ नणंदाही नव्हत्या—दहाव्या वर्षीच मी घरची गृहिणी झालें. पण इकडलीं तिकडलीं चार घरं दिसताहेत ना मला ? लहानपणापासून आरडाओरड, मारझोड, जिकडे तिकडे होत असलेली पहातें आहें. पुढं मोठेपणीं सुद्धां ही संवय कांहीं सुटत नाहीं. आरडाओरडा थांबत नाहीं. म्हणूनच तर छोटीच्या लग्नाचं मी अजून नांव काढीत नाहीं. नाहींतर परवां राजेश्वरीतळावरच्या घोषाळांकडून मागणी घेऊन एक आली होती. आंगभर दागिने, रोख हजार रुपये—तरीसुद्धां मी म्हटलं—नाहीं—आणखी दोन वर्षं कांहीं बोलायचं नाहीं.—"

आश्चर्यचकित होऊन नीलांबरनें वर पाहिलं आणि म्हटलं, " कन्याविक्रय करायचा आहे का तुला ? पैसे घ्यायचे आहेत मुलीचे ? "

विराज म्हणाली, " कां घेऊं नयेत ? आमच्या घरीं मुलगा असता तर पैसे देऊन मुलगी घरीं आणावी लागलीच असती कीं नाहीं ? तीनशें रुपये देऊन तुम्ही मला विकत आणली ना ? भावजीच्या लग्नाच्या वेळीं पांचशें रुपये द्यावे लागले नाहींत का ? नाहीं, नाहीं, आमच्या या भानगडींत तुम्ही पडूं नका. आमची जी रीत आहे ती आम्ही चालवणार. "

नीलांबर अधिकच आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " मुली विकायची आमची रीत आहे हें कुणी सांगितलं तुला ? सून आणतांना आम्ही पैसे देतो खरे, पण मुलीच्या लग्नाला एक पैसासुद्धां घेत नाहीं. मी छोटीचं कन्यादान करणार. "

नवऱ्याची ती विलक्षण मुद्रा पाहून विराजला एकदम हंसं कोसळलं. ती म्हणाली, " बरं, बरं, करा कन्यादान. आधीं जेवा, अन्न नुसतं चिवडून उठून जाऊं नका. "

नीलांबरलाही हंसं कोसळलं. तो म्हणाला, " नुसतं चिवडून उठून जातो का मी ? "

विराज म्हणाली, " नाहीं, एक दिवस सुद्धां असं म्हणायची नाहीं. या तुमच्या संवयीपायीं मला किती उपास करावे लागले आहेत तें तुमच्या धाकट्या भावजयीला माहीत आहे.—हें काय ? झालं वाटतं इतक्यांत जेवण ? "

अस्वस्थपणें हातांतील पंखा फेंकून दुधाची वाटी बळें बळेंच त्याच्या हाता देत विराज म्हणाली, " माझी शपथ आहे, उठायचं नाही. अग, ए ऽ छोटे, लौकर जा. धाकट्या वहिनीकडून दोन संदेश घेऊन ये—नाहीं नाहीं— मान कशाला हलवतां ती ? पोट भरलं नाहीं अजून तुमचं—माझ्या गळ्याची शपथ आहे—नाहींतर मी अन्नाला हात लावायची नाहीं. काल रात्रीं एक वाजेपर्यंत जागून तयार केले आहेत संदेश. "

एका थाळींत सारेच संदेश घेऊन हरिमती धांवत धांवत आली आणि ती थाळी तिनं त्याच्या ताटाजवळ ठेवली.

हंसत हंसत नीलांबर म्हणाला, " ठीक आहे. आतां तूंच सांग, हे एवढे संदेश का आतां माझ्या घशाखालीं उतरणार आहेत ? "

मिठाईची संख्या पाहून विराजनें मान खालीं घातली. ती म्हणाली, "बोलत बोलत खायला सुरवात करा म्हणजे खपतील सारे."

"म्हणजे खाल्लेच पाहिजेत तर?"

विराज म्हणाली, "हो! मासे खायचं सोडलंत—म्हटलं जाऊं द्या. पण असले तरी चार जिन्नस थोडे जास्त खाल?"

थाळी जवळ ओढून नीलांबर म्हणाला, "असं वाटतं, तुझ्या या खाण्याच्या सक्तीपायीं कुठं तरी जंगलांत जाऊन बसावं."

छोटी एकदम म्हणाली, "मलासुद्धां तसंच वाटतं दादा."

तिला धमकावून विराज म्हणाली, "गप्प रहा, भद्रकपाळे! खाल्लं नाहींस तर जगणार कशी? उद्यां सासरीं गेलीस म्हणजे नांवं ठेवशील मला!"

## २

महिना दीड महिना गेला. पांच दिवसांच्या तापानंतर आज सकाळपासून नीलांबरचा ताप निघाला होता. त्याचे मळके कपडे विराजनें स्वतः काढले आणि धुवट कपडे त्याच्या अंगावर चढवून जमिनीवर बिछाना घालून तिनें त्याला निजवलें. खिडकींतून दिसणाऱ्या नारळीकडे पहात निलांबर उगीच पडून राहिला होता. छोटी हरिमती शेजारीं बसून हळू हळू वारा घालीत होती.

थोड्या वेळानें स्नान करून विराज आंत आली. ती पीतांबर नेसली होती. ओले केंस तिच्या पाठीवर रुळत होते. ती येतांच घर जसें कांहीं एकदम उजळून उठलें. तिला पाहतांच नीलांबर म्हणाला, "हें काय?"

विराज म्हणाली, "आतां जातें, पंचाननबाबाला पूजेचं पाठवून द्यायचंय्—" असें म्हणून गुडघे टेंकून ती त्याच्या उशाजवळ बसली आणि कपाळावर हात ठेऊन तापाचा अंदाज घेत म्हणाली, "नाहीं. आतां ताप नाहीं. यंदा देवीच्या मनांत काय आहे कोण जाणे! घरोघर आकांत सुरू झाला आहे. आज सकाळींच कुणी सांगितलं—कीं मोडलाच्या मुलाच्या अंगावर देवी दिसूं लागल्या आहेत. एक तीळ ठेवायला सुद्धां जागा नाहीं."

नीलांबरनें अस्वस्थ होऊन विचारलें, "मोतीच्या कुठल्या मुलाला देवी आल्या आहेत?"

"मोठ्या मुलाला. आई शीतलादेवी, आतां गांव शांत कर आधीं. काय

सांगावं, हाच मुलगा काय तो आजारी. गेल्या शनिवारींच पहा, जाग आली, सहज तुमच्या अंगावर हात पडला. पाहिलं, अंग जसं कांहीं पेटत होतं—भीतीनं काळजांतलं रक्त सांकळून गेलं. उठून बसलें—पोटभर रडून घेतलं—मग नवस केला—म्हटलं—'आई शीतलादेवी, लौकर गुण आला आई, तर तुझी पूजा करीन तेव्हांच तोंडांत पाणी घालीन. नाहींतर उपास करून जीव देईन'—" बोलतां बोलतां तिचे डोळे भरून आले. आसवांचे चार थेंब खालीं घळघळून पडले.

आश्चर्यचकित होऊन नीलांबर म्हणाला, "तूं उपास करते आहेस कीं काय ?"

छोटी म्हणाली, "होय दादा, कांहींच खात नाहीं वहिनी. संध्याकाळीं एक मूठ पोहे आणि पेलाभर पाणी काय तें घेतलंय तिनं. कुणाचंच ऐकत नाहीं."

नीलांबर अत्यंत असंतुष्ट होऊन म्हणाला, "आतां हें तुझं वेड नव्हे वाटतं ?"

पदरानें डोळे पुसून विराज म्हणाली, "कोण म्हणतो वेड नव्हे ? अस्सल वेड तेंच हेंच. बायकोच्या जन्माला आलां असतां म्हणजे नवरा म्हणजे काय चीज हें कळलं असतं तुम्हांला ! इतके दिवस नवऱ्याला ताप येत राहिला, तर काळजांत काय होत असतं तें कळलं असतं तुम्हाला—" असं म्हणून उठून ती जायला निघाली होती. पण तितक्यांत थांबून म्हणाली, "छोटे, पूजेचं घेऊन दाई जाते आहे. तिच्याबरोबर जा. लौकर परत घेऊन ये तिला."

छोटीला आनंद झाला. उठून उभी राहून ती म्हणाली, "खरंच जाऊं वहिनी ?"

"पण उशीर लावूं नकोस. जा—तुझ्या दादाला लौकर गुण यावा म्हणून देवाकडे मागणं मागून घे."

छोटी धांवतच निघून गेली.

नीलांबर हंसून म्हणाला, "तिलाच मागतां येईल तें. तुझ्यापेक्षां तिलाच चांगलं साधेल तें."

विराज हंसली आणि मानेला एक झटका देऊन म्हणाली, "तें नका मला सांगूं. भाऊ म्हणा कीं आईबाप म्हणा, बायकांच्या जातीला नवऱ्याहून मोठं दुसरं कांहीं नाहीं. आईबापभाऊ गेले तर क्लेश सोसावे लागतात पण नवरा

गेला कीं सारंच गेलं. आतां हेंच पहा, पांच दिवस उपास करतें आहे पण हा उपास करतें आहे हें मनाच्या तळमळीमुळं ध्यानांत सुद्धां येत नव्हतं. तुमच्या कुणा वहिणीला बोलवून विचारून पहा ना एकदां."

नीलांबर एकदम मधेंच म्हणाला, "पुनः ?"

विराज म्हणाली, "मग बोलतां कां ? वेडगळपणा करतेंय कीं काय करतेंय तें माझं मला माहिती आहे. अन् ज्या कुणी देवानं मला तोंड दिलं आहे त्यालाच माहिती आहे. तसं कांहीं झालं तर एक दिवस सुद्धां जगून राहिलें नसतें. कपाळाचं कुंकूं पुसून जायच्या पूर्वी दगडावर कपाळ फोडून घेतलं असतं. कुणी पाहिलं, तर त्याला अपशकून व्हायचा. मंगलकार्याच्या वेळीं जवळ कुणी उभं सुद्धां करायचा नाहीं—बांगड्या पिचलेले हे दोन हात कुणासमोर बाहेर देखील दाखवायचे नाहींत—माथ्यावरचा पदर मागं घेऊन तोंड दाखवायची सुद्धां जिथं शरम — छेः छेः! जगणं म्हणायचं का त्या तसल्या जिण्याला ?—त्याकाळीं त्यांना नवऱ्याच्या सरणावर जाळीत तेंच बरं होतं. बायकोच्या जन्माला यायचं दुःख काय तें त्याकाळीं पुरुषांना कळून येत होतं. आतां कुणालाच जाणवत नाहीं नं."

नीलांबर म्हणाला, "आतां तूंच दे एकदां चांगलं समजावून."

विराज म्हणाली, "हो तर—देईन ना. अन् नुसती मीच कां ? तुमच्या पदरीं पडून जी कुणी तुम्हाला हरवून बसेल तीसुद्धां चांगलं समजावून देईल ! मी एकटीच नव्हे. छेः ! काय बडबडतें आहे मी—" असें म्हणून ती हंसू लागली.

पुनः एकदां खालीं वांकून तिनें नवऱ्याचें कपाळ, छाती आणि अंग हात लावून पाहिलें आणि म्हटलें, "अंग ठणकत बिणकत नाहीं ना ?"
मान हलवीत नीलांबर म्हणाला, "नाहीं."

विराज म्हणाली, "तर मग आतां कांहीं भ्यायला नको. आज भूक लागली आहे मला. आतां जातें—आधण टाकतें चुलीवर. अगदीं खरं सांगतें तुम्हाला. आज कुणी जर माझा एक हात कापून घेतला तरी सुद्धां मला राग यायचा नाहीं."

यदू गडी बाहेरून हांक मारून म्हणाला, "वैद्यबुवांना बोलवायला गेलं पाहिजे का माई ?"

नीलांबर म्हणाला, "नाहीं, नाहीं. आज नको बोलवायला."

तरीही गृहिणीची अनुमती मिळेपर्यंत यदू थांबून राहिला होता. त्याला पाहून विराज म्हणाली, " नाहीं. जा त्यांना घेऊन ये. एकदां चांगली परीक्षा करूं देत त्यांना. "

तीन चार दिवसांनीं चांगलें बरें वाटल्यावर नीलांबर आंगणांत येऊन बसला होता. तितक्यांत मोती मोडल आणि रडूं लागला. तो रडत रडत म्हणाला, " दादाठाकूर, तुम्ही एकदां येऊन पाहून गेल्याखेरीज माझा शीमंत कांहीं वाचायचा नाहीं. एकदां तुमची पायधूळ झाडा देवा, त्यानंच कदाचित् गुण आला तर येईल—" त्याच्यानें पुढं बोलवेना. तो सारखा ओक्साबोक्शीं रडूं लागला.

नीलांबरनं विचारलं, " अंगावर फोड्या फारच उठल्या आहेत वाटतं मोती ?"

डोळे पुशीत पुशीत मोती म्हणाला, " आतां कसं सांगूं ? देवीनं जसा कांहीं एक जात हात टाकला आहे अंगावर. आम्ही अज्ञानीं माणसं ठाकूरदादा, काय करायचं कांहीं समजत नाहीं. एकदां या ना. " असें म्हणून त्यानें त्याचे दोन्ही पाय कडकडून धरले.

हळूहळू आपले पाय सोडवून घेऊन नीलांबर प्रेमळपणें म्हणाला, " कांहीं भिऊं नकोस मोती, जा. आतां मी येतों थोड्या वेळानं. "

त्याच्या रडण्यामुळं त्याला स्वतःच्या दुखण्याचा विसर पडला. आपण आजारी असल्याचं त्यानं त्याला सांगितलं नाहीं. सर्व प्रकारच्या रोग्यांची सेवा शुश्रुषा करायची संवय असल्यामुळें तो या कामीं फार तरबेज झाला होता. आजूबाजूच्या गांवांत कुणीही माणूस अत्यवस्थ आजारी झाला तर त्याला भेटल्याशिवाय, त्याच्या तोंडचा आशीर्वाद ऐकल्याशिवाय, रोग्याच्या जिव्हाळयाच्या माणसांना समाधान वाटत नसे.

स्वतः नीलांबरलाही ही जाणीव होती. डॉक्टरवैद्यांच्या औषधापेक्षां त्याच्या हातच्या अंगारतीर्थप्रसादावर गांवच्या अशिक्षित थोरांची जास्त श्रद्धा होती. म्हणूनच अशावेळीं कुणीही त्याला बोलवायला आला तर तो त्याला विन्मुख जाऊं देत नसे.

मोती मोडल पुनः एकवार रडला, पुनः एकवार त्यानें त्याचे पाय धरून त्याच्याकडून वचन घेतलें आणि डोळे पुशीत पुशीत तो निघून गेला.

उद्विग्नपणानें नीलांबर विचार करूं लागला. अजूनही त्याच्या देहांत पुरेशी

ताकत आली नव्हती. पण त्याची त्याला पर्वा नव्हती. घराच्या बाहेर निघून जायचें कसें याचीच काळजी त्याला पडली होती. अशा कामीं त्याला विराजची फार भीति वाटे. कोणत्या तोंडानें ही गोष्ट तिला सांगायची ?

अगदीं याच वेळीं आंतल्या पडवींतून हरिमतीची कर्कश हांक ऐकूं आली. " दादा, वहिनी घरांत येऊन पडायला सांगते आहे तुला. "

नीलांबरनें उत्तर दिलें नाहीं.

एक दोन मिनिटांनीं स्वतः हरिमती येऊन हजर झाली. ती म्हणाली, " ऐकूं आलं नाहीं का दादा ? "

मान हलवून नीलांबर म्हणाला, " नाहीं. "

हरिमती म्हणाली, " चार घांस खाईपर्यंत बसली आहे ती. वहिनी म्हणाली, आतां बसून राहूं नका—आतां जरा आडवे व्हा. "

नीलांबरनें हळूच विचारलें, " ती काय करते आहे ग छोटे ? "

हरिमती म्हणाली, " आतां जेवायला बसली आहे. "

नीलांबर लडिवाळपणानें म्हणाला, " माझी बाळ ती. एक काम करशील ? "

छोटी म्हणाली, " करीन. "

आवाज आणखी थोडा खालीं उतरवून नीलांबर म्हणाला, " हलकेच जाऊन माझं उपरणं आणि छत्री घेऊन ये पाहूं. "

" उपरणं आणि छत्री ? "

नीलांबर म्हणाला, " हो. "

भुंवया वर चढवून हरिमति म्हणाली, " बापरे ! याच बाजूला पुढा करून वहिनी जेवायला बसली आहे ना ? "

काकुळतीला येऊन नीलांबर म्हणाला, मग नाहीं आणतां येत तर ? "

ओंठ वाकडे करून दोन तीन वेळ मान वांकडी करून हरिमती म्हणाली, " नाहीं दादा, ती पकडील. तूं आपला झोंपायला चल. "

त्यावेळीं सुमारें दोन वाजले होते. बाहेर ऊन कडक पडलें होतें. तिकडे पाहिलें, त्यावेळीं छत्रीशिवाय बाहेर जायची कल्पनाच मोठी कठीण वाटली. तो हताश झाला आणि बहिणीचा हात धरून आंतल्या खोलींत येऊन आडवा झाला.

कांहीं वेळपर्यंत हरिमती कांहीं ना कांहीं सारखी बडबड करीत होती. बोलतां बोलतां ती केव्हांच झोंपी गेली. नीलांबर मुकाट्यानें आडवा पडून विचार करीत

होता. कोणत्या प्रकारें बोलणें काढलें तर विराजच्या मनाला पाझर फुटेल याची पुनः पुनः योजना करून पहात होता.

दिवस मावळत आला होता. खोलीच्या थंडगार सिमिटाच्या जमिनीवर उपडी पडून आधाराला एक उशी हाताखालीं घेऊन, विराज आपल्या मामाला आणि मामीला चांगलें चार पानांचें पत्र लिहिण्यांत मग्न झाली होती. या घरावर शीतलादेवीची करडी नजर कां फिरली नाहीं, मरणाची वावटळ कशी टळली, कपाळींचं कुंकू अन् हातींचा चुडा कसा कायम राहिला वगैरे वगैरे गोष्टी पुनः पुनः लिहितां लिहितां कांहीं केल्या पत्र पुरें होत नव्हतें. इतक्यांत खाटेवर पडल्या पडल्या नीलांबरनें तिला हांक मारली आणि म्हटलें, "माझं ऐकशील का विराज?"

दौतींत लेखणीं ठेऊन तोंड वर करून पाहून विराजनें विचारलें,—"काय तें?"

"ऐकशील तर सांगतों."

विराज म्हणाली, "ऐकण्याजोगं असेल तर ऐकेन. काय तें?"

क्षणभर विचार करून नीलांबर म्हणाला, "सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं विराज. तूं कांहीं माझं ऐकायची नाहींस."

विराजनें पुनः विचारलें नाहीं. दौतींतली लेखणी उचलून पत्र पुरें करण्यासाठीं ती पुनः एकदा सरसावली. पण पत्र लिहिण्याकडे तिचें लक्ष लागेना. तिची जिज्ञासा सारखी वाढत होती. ती उठून बसून म्हणाली, "बरं आहे, बोला. मी कबूल करतें."

नीलांबर थोडासा हंसला. जरा मागें पुढें करून म्हणाला, "दुपारीं मोती मोडला आला होता. माझे पाय धरून बसला होता. मी तिथं गेल्याशिवाय त्याचा मुलगा शीमंत वांचायचा नाहीं असा त्याचा समज आहे. मला एकदां जाऊं दे ना तिकडे."

त्याच्या तोंडाकडे पहात विराज नुसती बसून राहिली होती. थोड्या वेळानें ती म्हणाली, "अशा या थकलेल्या स्थितींत का तुम्हीं जाणार?"

"काय करायचं विराज? शब्द देऊन चुकलों आहें. मला एकदां गेलंच पाहिजे."

"कां शब्द दिलात?"

नीलांबर कांहीं न बोलतां उगीच बसून राहिला.

कठोरपणानें विराज म्हणाली, " तुमच्या जीवावर तुमची एकट्याचीच मालकी आहे असं का तुम्हाला वाटतं ? कांहीं बोलणारं इथं कुणीच नाहीं का ? हवं तसं वागेन असं का तुम्हाला वाटतं ? "

विषयाचं महत्त्व कमी करण्यासाठीं नीलांबरनें तें भाषण हंसण्यावारीं न्यायचा प्रयत्न केला पण वायकोच्या तोंडाकडे पाहिलें तेव्हां त्याला हंसण्याचा धीर झाला नाहीं. जिवाचा धडा करून तो म्हणाला, " पण त्याच्या डोळ्यांतलीं टिपं पाहिलीं—"

विराज मधेंच म्हणाली, " छान, छान, त्याच्या डोळ्यांतलीं टिपं पाहिलीं म्हणे ! अन मी इथं रोज रडत बसलें आहें तें बघायला आहे का कुणी या जगांत ?—" बोलतां बोलतां तिनें लिहिलेलें तें चार पानी पत्र हातीं घेऊन तुकडे तुकडे करून फेंकून दिले आणि म्हटलें, " हंः ! पुरुषांची जातच अशी. न खातां, न जेवतां, न झोंप घेतां, चार दिवस अन् चार रात्रीं काढल्या—आतां हातोहात त्याचं हें असं बक्षीस मिळतं आहे ! घरोघर ताप, घरोघर देवी, आपले पाय नाहीं सांवरत आणि चालले गांवचे रोगी पहायला ! बरं आहे. जा ! माझा देव बसला आहे तिथं—" असें म्हणून पुनः एकदां उशी पोटाखालीं घेऊन उपडी होऊन ती डोळे मिटून पडली.

नीलांबरच्या ओंठावर अगदीं बारीक, अगदीं नाजूक हंसण्याची छटा उमटून गेली. शांतपणें तो म्हणाला, " दर शब्दाला देवाची दुहाई देतेस—तुझी तेवढी श्रद्धा आहे का त्याच्यावर विराज ? "

ताड्कन् उठून बसून संतापल्या वाणीनें विराज म्हणाली, " नाहीं ! देवाच्या श्रद्धेचा मक्ता काय तो तुम्हांलाच दिला आहे !—आम्हाला नाहीं. आम्ही भजनं करीत नाहीं, तुळशीची माळ घालीत नाहीं—मढीं भाजीत नाहीं—म्हणून आम्हांला अधिकार नाहीं. अधिकार काय तो तुम्हांला एकट्यालाच ! "

ती रागावली असें पाहून नीलांबरला हंसू आलें. तो म्हणाला, " रागाऊं नकोस विराज. अगदीं खरं आहे तें. तूं एकटीच नव्हे—तुम्ही साऱ्याच तशा ! देवावर श्रद्धा ठेवण्यासाठीं मनाचा जेवढा जोर लागतो, तेवढा जोर बायकांच्या जातीच्या अंगीं नाहीं. त्यांत तुलाच दोष कसला द्यायचा ? "

आणखी रागावून विराज म्हणाली, " हा दोष नव्हे बरं. हा बायकांच्या जातीचा गुण आहे. देहांतल्या जोराचीच जर जरूरी आहे म्हणायची, तर वाघ-लांडग्यांच्या अंगीं काय कमी जोर आहे ? जोर असो वा नसो, असल्या या

आजारीपणांतून उठलेल्या स्थितींत मी तुम्हांला बाहेर जाऊं द्यायची नाहीं. मग हवा तेवढा वितंडवाद घालीत बसा ना का !"

यानंतर बोलण्याचा नीलांबरला धीर झाला नाहीं. तो तसाच आडवा पडून स्वस्थ राहिला. विराज सुद्धां बराच वेळपर्यंत मुकाट्यानें बसून राहिली होती.

"किती उशीर झाला. आतां जावं." असें म्हणून ती उठून गेली.

घटकाभरानें दिवा पेटवायला म्हणून ती आंत आली आणि पहाते तों बिछान्यावर नवरा नाहीं. तशीच धांवत ती बाहेर आली आणि म्हणाली, "छोटे, तुझा दादा कुठं गेला ? जा. जा, बाहेर जाऊन आधीं पहा जा—"

छोटी एकदम पळत सुटली.

चार पांच मिनिटांनीं धापा टाकीत टाकीत ती परत आली आणि म्हणाली, "कुठंच नाहीं सांपडत. नदीकांठीं सुद्धां नाहीं."

मानेला एक झटका देऊन विराज उद्गारली, "हूं: !"

ती स्वयंपाकघराच्या दाराशीं आली आणि धप् करून एकदम खालीं बसली.

## ३

तीन वर्षांनंतरची गोष्ट.

दोन महिन्यापूर्वी हरिमती आपल्या सासरीं निघून गेली होती. धाकटा भाऊ पीतांबर घरांतल्या घरांत दुसरी चूल करून विभक्त झाला होता. बाहेरच्या चंडीमंडपाच्या चौथऱ्यावर संध्याकाळच्या सांवल्या स्पष्ट दिसत होत्या. फाटकी चटई पसरून नीलांबर मुकाट्यानें तिथें बसला होता. कांहीं न बोलतां विराज तिथें आली आणि जवळ उभी राहिली. तिच्याकडे पाहून नीलांबर म्हणाला, "कां ? एकदम अशी बाहेर कां आलीस ?"

चटईच्या एका बाजूला बसत विराज म्हणाली, "एक गोष्ट विचारायला आलें आहें."

"काय ?"

विराज म्हणाली, "काय खाल्लं म्हणजे मरण येतं तें सांगाल का मला ?"

नीलांबर उगीच राहिला.

विराजनें पुन: विचारलें, "सांगा कीं सांगूं नका—पण रोज असे वाळत कां चालला आहांत तेवढं तरी मला स्पष्ट करून सांगाल ?"

" कोण म्हणतो वाळत चाललों आहें म्हणून ? "

डोळे टवकारून विराज क्षणभर नवऱ्याच्या तोंडाकडे पहात राहिली. त्यानंतर म्हणाली, " आतां ऐका ! कुणी तरी सांगणार तेव्हां का मला कळणार ? खरंच का तुम्हाला असं वाटतं ? "

नीलांबर उगीच थोडासा हंसला. स्वतःची चूक सांवरून घेण्यासाठीं म्हणाला, " नाहीं ग, तसं नव्हे. तरी पण वहुधा तुझा अंदाज चुकतो म्हणून विचारतोंय् , कीं—कुणी तरी असं म्हटलं कीं हा तुझाच अंदाज आहे ? "

असल्या या प्रश्नाचें सरळ उत्तर देण्याची विराजला आवश्यकता वाटली नाहीं म्हणून ती म्हणाली, " किती सांगितलं तुम्हांला, कीं असल्या घरीं छोटीला देऊं नका—पण त्यावेळीं तुम्ही कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां ऐकलं नाहीं !—रोकड होती ती गेली. माझ्या अंगांवरचे सारे दागिने गेले. यदू मोडलकडे खंडानं असलेली जमीन गहाण पडली. दोन बागा विकून टाकल्या. आतां हीं दोन वर्षं अशी नापिक गेलेलीं; आतां मला सांगा, जांवयाच्या शिक्षणाचा खर्च महिनोमहिने कसा चालवणार तुम्हीं ? तसं कांहीं असतं गांठीला तर छोटीसाठीं ही खूट सहन केली असती. मोठी मानी पोर आहे ती माझी ! तुम्हांला नांव ठेवलेलं तिला मुळींच सहन व्हायचं नाहीं. शेवटीं काय करतांना काय व्हायचं आहे तें त्या देवालाच माहीत ! कां असा हा अविचार केलात ? "

नीलांबर उगीच राहिला. विराज म्हणाली, "—शिवाय असं पहा, छोटीच्या कल्याणाच्या काळजीनं रात्रंदिवस असं कपाळ धरून बसलां तर शेवटीं माझाच सत्यानाश कराल. त्यापेक्षां आतां एक करा, चार पांच बिघे जमीन विकून शेंपांचशें रुपये उभे करा अन् ते घेऊन जा जांवयाच्या बापाकडे, अन् पदर पसरून त्याला सांगा—' हें आहे एवढं घ्या—आणि मला मोकळं करा बाबानों. आम्ही गरीब माणसं आहों. यापुढं आम्हांला हें झेपायचं नाहीं. ' मग छोटीच्या अदृष्टांत जसं कांहीं असेल तसं होईल. "

तरीही नीलांबर मुकाट्यानें बसून राहिला.

वळून त्याच्या तोंडाकडे पाहून विराज म्हणाली, " काय ? असं कांहीं बोलायचा धीर नाहीं व्हायचा ? "

एक मोठा सुस्कारा सोडून नीलांबर म्हणाला, " बोलेन—पण सारंच जर विकून टाकून बसलों विराज, तर पुढं आमचं व्हायचं कसं ?

विराज म्हणाली, " आतां व्हायचं राहिलंय काय ? विषय गहाण टाकून

व्याजापायीं सावकाराच्या शिव्यागाळी ऐकत राहाण्यापेक्षां तें फार बरं. मला कांहीं कुणी मूलबाळ नाहीं. ती एक काळजी मिटली आहे. आम्ही हे दोन जीव. चालेल आपलं कसंबसं. नाहींच चाललं तर तुम्ही आहांतच कीं वैष्णवठाकूर—मीही होईन वैष्णवी—अन् मग जाऊं दोघंही काशी-वृन्दावनची यात्रा करीत. ”

उगीच थोडेसें हंसून नीलांबर म्हणाला, “ तूं काय करशील ? टाळ वाजवशील ? ”

“ नाहींच कांहीं जमलं तर निदान तुमची झोळी घेऊन तर फिरेन तुमच्या बरोबर ? तुमच्या तोंडचं राधाकृष्णाचं भजन ऐकलं तर पशुपक्षी देखील थांबून ऐकतात. मग आम्हां दोन जीवांचं कसं तरी नाहीं का भागायचं ? चला, घरांत चला. या काळोखांत तुमचा मोहरा दिसत नाहीं चांगलासा. ” तीं दोघंही आंत गेलीं.

हातांतली दिवली नवऱ्याच्या तोंडासमोर धरून तिनं कांही वेळपर्यंत एक शब्दसुद्धां न बोलतां चांगलं पाहून घेतलं. हंसूं येत होतें तें आवरून ती म्हणाली, “ नाहीं—धीर होत नाहीं. आपल्या या वैष्णवाला दहापांच वैष्णवींच्या मेळ्यांत मिसळूं देण्याइतका जिवाचा धडा करतां येत नाहीं मला. त्यापेक्षां इथंच झुरून झुरून मेलेलं परवडलं. ”

नीलांबर हंसूं लागला. तो म्हणाला, “ वा ग वा ! तिकडे काय नुसत्या वैष्णवीच असतात ? अग वैष्णव सुद्धां असतात तिथं. ”

विराज म्हणाली, “ मग असेनांत ! एक दोघेच का—हजार हजार लक्ष लक्ष कां असेनांत—” असं म्हणून दिवली जागच्या जागीं ठेवून परत येऊन ती त्याच्या पायांजवळ बसली आणि गंभीर होऊन म्हणाली, “ बरं, आतां हें सांगा मला, या जगांत सती—असती—दोघीही असतात. असती बायका अजून या डोळ्यांनीं कांहीं मी पाहिल्या नाहींत. पहावं असं फार वाटतंय मला ! त्या कशा काय असतात ? अशा माझ्या सारख्याच असतात दिसायला, कीं कांहीं वेगळ्या असतात ? कशी काय असते त्यांची चालचलणूक ? काय करतात, काय खातात, काय जेवतात,—सारं कांहीं पहायची इच्छा आहे मला. सांगा ना. तुम्ही पाहिल्या आहेत ? ”

नीलांबर म्हणाला, “ पाहिल्या आहेत. ”

“ पाहिल्या आहेत ? बरं,—आतां मी ही इथं बसून जशी बोलतें आहें

तुमच्याबरोबर, अशाच बसून त्या देखील वाटेल त्याच्याबरोबर अशाच का गुजगोष्टी करतात ? "

नीलांबर हंसून म्हणाला, " तें कसं सांगूं ? तसलं कांहीं पाहायला नाहीं मिळालं मला. "

डोळ्याचं एक पातें सुद्धां न हालवतां क्षणभर नवऱ्याच्या चेहऱ्याकडे विराज पहात राहिली. एकाएकीं काय तिच्या मनांत आलें कोण जाणे—तिच्या सर्वांगावर कांटा उभा राहिला. सर्वांगाला पुनः पुनः शिरीशिरी येऊं लागली. तें नजरेला आल्यामुळें नीलांबर म्हणाला, " काय झालं ग ? "

विराज उद्गारली, " छेः जाऊं दे. मरूं देत त्या. दुर्गा ! दुर्गा ! सांजवातीच्या वेळीं कसला विषय निघाला हा !—कां ? संध्या झाली नाहीं वाटतं ? "

नीलांबर म्हणाला, " हा उठलोंच. "

" हं, उठा. हातपाय धुवून या. मी इथंच ठेवतें तुमचं आसन. अन् पान पण इथंच वाढतें. "

पांच सहा दिवसानंतरची गोष्ट.

रात्रीं दहाच्या सुमाराला गुडगुडीची नळी तोंडांत घेऊन नीलांबर बिछान्यावर आडवा पडून डोळे मिटून तंबाखू ओढीत होता. सारें घरचें काम आटोपून विराजही जवळच येऊन बसली होती. झोंपायच्या पूर्वी तिथेंच जमिनीवर बसून स्वतःच्यासाठीं भलें मोठें एक पान तयार करतां करतां ती मध्येंच म्हणाली, " बरं, मला असं सांगा—शास्त्रांत सांगितलं आहे तें सारं खरंच का असतं ? "

तोंडची गुडगुडीची नळी बाजूला ठेऊन बायको बसली होती त्या बाजूला वळून नीलांबर म्हणाला, " शास्त्रांतल्या गोष्टी जर खऱ्या नव्हेत तर काय खोट्या ? "

विराज म्हणाली, " तसं नव्हे. खोट्या म्हणत नाहीं मी. पण त्या काळीं जसं कांहीं घडत होतं तसं आतां सुद्धां घडून येतं का ?

क्षणभर विचार करून नीलांबर म्हणाला, " मी कांहीं शास्त्रीपंडित नाहीं विराज. सारंच कांहीं कळत नाहीं मला. पण मला वाटतं, सत्य तें केव्हांही सत्यच. जसं त्या काळचं सत्य तसंच या काळचं ! "

विजय म्हणाली, " बरं—ही सावित्री सत्यवानाचीच गोष्ट घ्या. मेलेल्या नवऱ्याला तिनं यमाच्या हातून हिसकावून काढून आणलं.—खरं असेल का हें ? "

नीलांबर म्हणाला, " कां नाहीं असायचं ? तिच्यासारखी जी सती असेल तिला कांहीं अशक्य नाहीं—"

" तर मग मला देखील साधेल का तें ? "

नीलांबर सारखा हंसत सुटला. तो म्हणाला, " तुला तिच्यासारखी का सती म्हणायची ? त्या होत्या देवदेवता. "

पानाचा डबा एका बाजूला लोटून विराज म्हणाली, " असतील त्या देवता. सतीत्वाच्या बाबतींत माझ्यासारखीला त्यांच्यापेक्षां कमी कां म्हणायचं ? या जगांत माझ्यासारख्या सती आणखीही कुणी असतील—पण मनानं आणि ज्ञानानं आमच्यासारख्या आणखी कुणी सती नसतील असं कांहीं मला वाटत नाहीं. कुठल्याही सतीपेक्षां मी एक तिळभर सुद्धां कमी नाहीं—मग ती सावित्री असो, कीं आणखी दुसरी कुणी असो. "

नीलांबरनें उत्तर दिलें नाहीं. कांहींच न बोलतां तो तिच्या तोंडाकडे नुसता पहात राहिला. दिवा समोर आणून ठेवून विराज पानाचा विडा करीत बसली होती. त्या दिव्याचा सारा प्रकाश तिच्या चेहऱ्यावर पडत होता. त्या प्रकाशामुळें नीलांबरला स्पष्ट दिसून आलें, कीं एक विलक्षण प्रकारच्या तेजाच्या ठिणग्या विराजच्या दोन्ही डोळ्यांतून बाहेर पडत होत्या.

थोड्या घाबरटपणानं नीलांबर चट्कन् बोलून गेला, " तर मग तुला देखील तें साधेल म्हणायचं. "

बसल्या जागेवरून उठून विराज नवऱ्यापाशीं आली आणि गुडघे टेंकून नवऱ्याच्या दोन्ही पायांवर एकदां डोकें ठेवून घेऊन तिथंच पायाजवळ बसली आणि म्हणाली, " एवढाच आशीर्वाद मला द्या. जोंपर्यंत कांहीं कळतं आहे तोंपर्यंत, या दोन पायांपलीकडे या जगांत मला कांहींच मोठं वाटूं नये, एवढाच आशीर्वाद द्या. खरोखर जर मी तशीच सती असेन, तर तसाच प्रसंग आला म्हणजे तिच्यासारखेंच तुमचे प्राण परतवून आणायचं सामर्थ्य मला लाभेल. त्यानंतर या पायांवर डोकं ठेवून हाच कुंकवाचा मळवट—हाच हातींचा भरला चुडा घेऊन, चितेवर चढायचं भाग्य मला लाभेल ! "

अस्वस्थ होऊन नीलांबर उठून बसला आणि म्हणाला, " आज तुला काय झालं आहे ग विराज ! "

विराजच्या दोन्ही डोळ्यांतून आंसवं टप्टप् गळत होतीं. त्यांतूनच तिच्या ओठांच्या कोंपऱ्यांत अतिशय गोड, अतिशय मधुर अशी हंसण्याची छटा

हळूच फुटून उठली. ती म्हणाली, " तें काय तें केव्हांतरी एकदां सांगेन. आज नुसता आशीर्वाद द्या मला—मरतांना या दोन पायांची धूळ मला पवित्र करील, या मांडीवर डोकं टेंकून तुमच्या तोंडाकडे पहात आनंदानं प्राण सोडीन, एवढाच आशिर्वाद द्या—" तिच्यानें पुढं बोलवेना—यावेळीं तिचा गळा दाटून आला.

नीलांबर घाबरला. बळेंबळेंच तिला आपल्या हृदयाशीं कवटाळून धरून म्हणाला, " काय झालंय ग आज ? कुणी कांहीं बोललं का तुला ? "

नवऱ्याच्या हृदयावर डोकं टेकून ती मुकाट्यानें रडत होती. त्याच्या प्रश्नाचें उत्तर तिनें दिलें नाहीं.

नीलांबर पुनः म्हणाला, " कधींच तूं असं कांहीं केलं नव्हतंस विराज. काय झालंय ? सांग ना ! "

तोंड वळवून विराजनं डोळे पुसले, पण नजर वर करून पाहिलें नाहीं. ती हळूच म्हणाली, " सांगेन पुढं केव्हां तरी. "

नीलांबरनें जास्त आग्रह धरला नाहीं. तो तसाच वसून राहिला होता. तिच्या केसांत आपलीं बोटें हळूहळू फिरवित तिचें सांत्वन करीत होता.

शक्तीच्या बाहेर खर्च करून बहिणीचें लग्न लावून दिल्यामुळें तो मोठ्या अडचणींत आला होता. त्यापूर्वी त्याचा संसार मोठासा सुबत्तेचा होता असें नव्हे. त्यांतून दोन वर्षें या दुष्काळाचीं गेलीं. कुणग्यांत धान्य नाहीं. तळ्यांत पाणी नाहीं—मासे नाहींत—केळीच्या बागा सुकत चालल्या होत्या, लिंबाच्या बागांतले कोवळे धोंडे गळून पडत होते आणि वर ऋणकऱ्यांची रहदारी आतां सुरू झाली होती. त्यांतच मुलाच्या शिक्षणाच्या खर्चासाठीं पैसे पाठवण्याबद्दल छोटीच्या सासऱ्याचीं गोड-कडक पत्रें येत होतीं.

ही सारी हकीकत विराजला माहीत नव्हती. या पुष्कळशा अप्रिय गोष्टी नीलांबरनें तिच्यापासून चोरून ठेवल्या होत्या. त्याला वाटलें, कुणीतरी या हकीकती विराजला ऐकवल्या असाव्या. त्या कल्पनेनें तो उद्विग्न झाला.

तितक्यांत वर तोंड करून विराज थोडीशी हंसली आणि म्हणाली, " एक प्रश्न विचारतें, खरं खरं सांगाल ? "

मनांतल्या मनांत नीलांबर अधिकच साशंक होऊन म्हणाला, " कोणता प्रश्न ? "

विराजच्या साऱ्या सौंदर्यात मोठ्यांतलें मोठें सौंदर्य होतें तें तिचें गोड

हंसणें. तें तसलें हंसणें हंसून त्याच्या तोंडाकडे पहात ती म्हणाली, "आतां सांगा, मी काळी नाहीं ना? कुरूप नाहीं ना?"

मान हलवीत नीलांबर म्हणाला, "नाहीं."

"समजा, मी काळी असतें, कुरूप असतें, तरी देखील तुम्हीं माझ्यावर एवढंच प्रेम केलं असतं का?"

हा विलक्षण प्रश्न ऐकून जरी तो कांहींसा आश्चर्यचकित झाला, तरीही पूर्वी आलेल्या कल्पनेनं हृदयावरचा मोठा थोरला भार कोसळून खालीं पडला असं त्याला वाटलं.

तो खूष होऊन हंसून म्हणाला, "लहानपणापासून एका अजब सुंदरीवर प्रेम करीत आलों. कुरूप काळी असती तर काय केलं असतं तें आतां कसं मला सांगतां येईल?"

दोन्ही हातांनीं नवऱ्याचा गळा घट्ट कवटाळून अगदीं त्याच्या तोंडाजवळ तोंड आणून विराज म्हणाली, "मी सांगतें काय केलं असतं तें. तरी सुद्धां मी तुम्हाला आवडलें असतें!"

तरीही नीलांबर मुकाट्यानं तिच्याकडे पहात राहिला.

विराज म्हणाली, "मला हें कसं कळलं, असंच तुम्हाला वाटतंय ना?"

आतां मात्र नीलांबर हळूहळू म्हणाला, "हो असंच वाटतंय. कसं कळलं तुला?"

गळ्यांतला हात काढून आपलें मस्तक त्याच्या हृदयावर ठेवून डोळे लावून पहात पहात विराज एक एक शब्द बोलत म्हणाली, "माझं मन सांगतं, जितकी मला तुमची पारख आहे तितकी तुम्हाला स्वतःला सुद्धां नाहीं—म्हणूनच मला कळलं हें, तुमचं किती प्रेम आहे माझ्यावर, हें अंतरींच्या खुणेनं जाणतें मी, ज्यामुळं पाप लागेल अशी कोणतीच गोष्ट तुमच्या हातून कधींच घडायची नाहीं. पत्नीवर प्रेम न करणं म्हणजे पाप आहे, हें मी जाणतें—मी आंधळी-पांगळी असतें तरी सुद्धां तुम्ही मला अशीच लाडावून ठेवली असती."

नीलांबरनं उत्तर दिलें नाहीं. विराज कांहीं वेळ स्वस्थ पडून राहिली होती. एकाएकीं हात वर करून तिनें अंदाजानें नवऱ्याच्या डोळ्याच्या कोपऱ्याला बोट लावून पाहिलें आणि म्हटलें, "पाणी का हें?"

हळूच तिचा हात दूर करून नीलांबर दाटलेल्या गळ्यानें म्हणाला, "कसं कळलं तुला!"

विराज म्हणाली, " नवव्या वर्षी माझं लग्न झालं आहे हें कसं विसरतां तुम्ही ? तुमची गांठ पडली तेव्हांपासूनच मी तुमची झाली आहे, हें कसं विसरतां तुम्ही ? या देहांत मी मिसळून गेलें आहें, हें अंगाला हात लावून देखील तुम्हाला कळत नाहीं का ? "

नीलांबर कांहीं बोलला नाहीं. त्याच्या झांकलेल्या डोळ्यांतून मोठमोठाले आसवांचे थेंब पाझरून खालीं पडत होते.

विराज उठून बसली आणि पदरानें हळूच त्याचे डोळे पुसून भरल्या गळयानें म्हणाली, " भितां कां ? मरतांना आईनं छोटीचा भार तुमच्या हातीं सोंपवला. छोटीचं कल्याण व्हावं म्हणून जें योग्य वाटलं तें तुम्ही केलं. तें पाहून तुमच्या आईनं स्वर्गातून तुम्हाला आशीर्वाद दिला असेल ! सर्वस्व गेलं तरी जाऊं दे—चांगले धडधाकट व्हा—ऋणमुक्त व्हा ! "

डोळे पुशीत पुशीत तशाच दाटल्या गळयानें नीलांबर म्हणाला, ' मी काय केलं आहे तें तुला माहीत नाहीं विराज. मी तुझं—"

विराजनं त्याला बोलूं दिलं नाहीं. त्याच्या तोंडावर हात ठेवून ती म्हणाली, " मला सारं कळतं आहे. मला काय कळलं आणि काय कळलं नाहीं याचा विचार करतां करतां मी तुम्हांला असं वाळत जायला द्यायची नाहीं—हेंही मला कळतं. नाहीं—नकोच तें. ज्याचं जें देणं असेल तें देऊन टाका. देऊन टाकून निश्चिंत व्हा. त्यानंतर माथ्यावर देव आहे आणि पायांजवळ मी आहें."

एक मोठा सुस्कारा सोडून नीलांबर उगीच बसून राहिला.

## ४

आणखीही सहा महिने निघून गेले. हरिमतीच्या लग्नापूर्वीच धाकटया भावानें इस्टेटीचा आपला वांटा वेगळा करून घेतला होता. नीलांबरच्या वांटयाला जें कांहीं आलें त्यांतला कांहीं भाग त्याच वेळीं गहाण ठेवून पैसे उभे करणें त्याला भाग पडलें होतें. पीतांबरनें त्यावेळीं एका कवडीचीही मदत केली नाहीं हें सांगणें नकोच !

शिल्लक राहिलेली जी शेतीवाडी होती त्यांतील एकामागून एक गहाण टाकीत,

लग्नाच्या वेळीं ठरलेल्या अटी पाळण्यासाठीं, नीलांबरला मेव्हण्याच्या शिक्षणाचा खर्च आणि स्वतःचा संसार चालवावा लागत होता.

अशा प्रकारें रोज रोज स्वतः अडचणींत सांपडून तो थकत चालला होता तरीही वडिलार्जित संपत्ति एकदम विकून टाकण्याचें धैर्य त्याला होईना. आज तिसऱ्या प्रहरीं शेजारचा भोलानाथ मुकर्जी थकलेल्या व्याजाच्या बाकीसाठीं त्याला बराचसा कडकावून गेला होता. आड राहून विराजनें तें सारें कांहीं ऐकलें आणि नीलांबर आंत येतांच स्वयंपाक घरांतून बाहेर येऊन ती मुकाट्यानें त्याच्यासमोर उभी राहिली.

तिच्या चेहऱ्याकडे पाहतांच नीलांबर मनांतल्या मनांत ओशाळून गारठला. अपमानाच्या संतापानें विराजच्या अन्तःकरणाचा भडका उडाला होता. मनांतला आवेग आवरून तिनें बोटानें खाट दाखवली आणि अत्यंत शांत गभीर स्वरानें ती म्हणाली, " इथं बसा—"

नीलांबर बिछान्यावर बसला तेव्हां ती येऊन त्याच्या पायाजवळ खालीं बसली आणि म्हणाली, " आतां एक मला ऋणमुक्त तरी करा, नाहींतर तुमच्या पायाला हात लावून मला प्रतिज्ञा करूं द्या—"

विराजला सारें कांहीं ऐकूं गेलें हें नीलांबरला कळून चुकलें, त्यामुळें अतिशय घाबरून त्यानें खालीं वांकून आपल्या हातानें तिचें तोंड बंद केलें आणि बळेंबळें तिला वर ओढून आपल्याजवळ बसवून घेऊन तो मोठ्या प्रेमळपणानें म्हणाला, " हें काय विराज ? एवढ्या क्षुल्लक गोष्टीसाठीं अवसान असं सोडूं नकोस."

तोंडावरचा त्याचा हात दूर लोटून विराज म्हणाली, " अशा वेळीं माणसाचं अवसान सुटायचं नाहीं तर सुटायचं तरी केव्हां ? सांगा ना ! "

काय उत्तर द्यावें तें विचार करून देखील ओंठावर येत नाहीं असें पाहून नीलांबर मुकाट्यानं बसून राहिला.

विराज म्हणाली, " आतां बोलत कां नाहीं ? द्या ना याचं उत्तर ! "

नीलांबर शांतपणें म्हणाला, " उत्तर कसलं देऊं विराज ? पण—"

त्याला मधेंच थांबवून विराज म्हणाली, " नाहीं. हें देखील पुरे झालं. माझ्या घराच्या दाराशीं उभे राहून लोक धडधडीत तुमचा अपमान करून जाताहेत, प्रत्यक्ष कानांनीं ऐकून मी स्वस्थ बसून राहीन असं तुम्हाला वाटत

असलं, तर ती तुमची चूक आहे. आतां यांतून कांहीं मार्ग तरी काढा, नाहीं तर मला जीव तरी देऊं द्या. ”

नीलांबर घाबरून म्हणाला, “एकाच दिवसांत का मार्ग काढतां येतो विराज?”

“ ठीक ! दोन दिवसांनीं काय मार्ग काढणार आहांत तें सांगा ना आतां मला चांगलं समजावून. ”

नीलांबर पुनः तोंड मिटून स्वस्थ राहिला.

विराज म्हणाली, “ कांहीं तरी अकल्पिताची आशा धरून स्वतःला फसवून घेऊं नका—असा माझा सर्व नाश करूं नका. एकएक दिवस जातो आहे तसतसं अधिकअधिक गुंतून पडायला होतं आहे. माझी शपथ आहे—मी पदर पसरतें, भीक मागतें, तुमचे हे पाय धरून विनवून सांगतें, काय करायचं असेल तें या वेळींच करा. ”

बोलतां बोलतां तिचे डोळे पाण्यानें भरून आले—गळा दाटून आला. भुलू मुखर्जीनें दिलेल्या शिव्या तिच्या हृदयाला बाणासारख्या भेदून गेल्या होत्या.

स्वतःच्या हातांनीं तिचे डोळे पुशीत नीलांबर शांतपणें म्हणाला, “ असं उतावीळ होऊन काय होणार विराज ? एकाद्या वर्षात जर सोळा आणे पीक आलं तर बारा आणे इस्टेट सोडवून घेईन. पण एकदां जर विकून टाकलं तर पुढं काय होईल तें तूंच विचार करून पहा. ”

विराज गहिंवरून म्हणाली, “ तो विचार केला आहे. येत्या वर्षी सोळा आणे पीक येईल याची खात्री तरी कुणी दिली आहे ? शिवाय हें व्याज आहे, लोकांची गांजणूक आहे, मी काय वाटेल तें सहन करीन पण कुणी तुमचा अपमान केला तर तो सहन व्हायचा नाहीं मला ! ”

नीलांबरला तें चांगलेंच माहीत होतें. म्हणूनच यानंतर बोलण्याचें त्यानें टाळलें.

विराज पुढें म्हणाली, “ एवढंच का माझं सारं दुःख ? मनांतल्या मनांत रात्रंदिवस पिचत माझ्या डोळ्यांसमोर तुम्ही वाळत चाललां आहांत. असली सोन्याची मूर्ति काळवंडून जाते आहे. माझ्या गळ्याला हात लावून सांगा, हें सारं सहन करायची ताकद आहे का माझ्या अंगीं ? योगेनचा—या मेहुण्याच्या शिक्षणाचा खर्च आणखी किती दिवस चालवणार ? ”

आतां फक्त एकच वर्ष. तेवढं झालं कीं तो डॉक्टर होईल. ''

क्षणभर थांबून विराज म्हणाली, '' छोटीला लहानाची मोठी केली. बिचारी राजाची राणी होवो ! पण या पोरीच्या पायीं आमचं घर हें असं मोडणार असं तेव्हां कळतं, तर तिला नेऊन नदींत बुडवून टाकलं असतं. असा स्वतः होऊन स्वतःच्या डोक्यावर दगड मारून घेतला नसता ! काय हें देवा ! तीं माणसं मोठीं आहेत, कसलीच उणीव नाहीं त्यांना, कसल्याच अडचणी नाहींत, तरी सुद्धां जळवांसारखं आमच्या काळजाचं रक्त शोषून घ्यायला त्यांना कांहींच कसं वाटत नाहीं ? एवढीसुद्धां दयामाया नाहीं का त्यांच्याठायीं ? ''—एक अतिशय मोठा सुस्कारा सोडून ती स्तब्ध होऊन राहिली.

बराच वेळपर्यंत ती मुकाट्यानं बसली होती. त्यानंतर नजर वर करून ती शांतपणें म्हणाली, '' चोंहीकडे ही अशी आबाळ, चोंहींकडे हा दुकाळ ! — गरीब दुःखी माणसं अशावेळीं कुणी उपाशीं रहाताहेत, तर कुणी एकवेळचं जेवण टाकलं आहे ! अशा वेळीं—अशा या दुकाळांत आम्ही गरीब माणसांनीं परक्याचा मुलगा शिकवून मोठा करायचा काय म्हणून ? छोटीच्या सासऱ्याला कसलाच कांहीं तोटा नाहीं. चांगला गडगंज श्रीमंत आहे. त्याला स्वतःला जर स्वतःच्या मुलाचं शिक्षण झेंपत नाहीं तर त्याच्या शिक्षणासाठीं आम्ही कां मरावं ?—आतां झालं तेवढं पुरे झालं. आतां यापुढं कुणाचं सुद्धां कर्ज काढायचं नाहीं. ''

मोठ्या कष्टानं कोरडें हसूं ओठावर आणीत नीलांबर म्हणाला, '' मला सारं कांहीं कळतं आहे विराज. पण शाळिग्राम समोर ठेवून शपथ केली आहे ना ? त्याचं काय व्हायचं ? ''

विराजनं एकदम उत्तर दिलें, '' कांहीं व्हायचं नाहीं ! शाळिग्रामाच्या ठिकाणीं जर खरोखरीच कांहीं देवपण असेल तर त्याला आमची अडचण आपोआप कळेल. अन् मी तर तुमची अर्धांगी. यांत जर कांहीं पाप असेल तर तें सारं माझ्या माथीं घेऊन मी नरकांत पिचत राहीन. कांहीं भ्यायला नको तुम्ही—आतां हें कर्ज काढणं पुरे झालं. ''

धार्मिक वृत्तीच्या आपल्या नवऱ्याच्या अंतःकरणांतील आत्यंतिक दुःखाची लहानसहान झुळूकही तिला अपरिचित नव्हती; पण यापुढें सहन करणें तिला अशक्य झालें होतें. नवरा म्हणजेच तिचें सर्वस्व होतें. त्या काळजीनं काळवंडत चाललेल्या नवऱ्याच्या रोगट चेहऱ्याकडे पाहून तिचें काळीज फाटत होतें.

ह्या वेळपर्यंत कसेंबसें रडें आवरून ती बोलत होती—पण आतां तें अशक्य झालें. एकदम नवऱ्याच्या कुशींत तोंड खुपसून ती फुलून फुलून रडूं लागली.

आपला उजवा हात विराजच्या मस्तकावर ठेऊन नीलांबर एक शब्दसुद्धां न बोलतां निश्चल होऊन बसून राहिला होता. एकदां पोटभर रडून घेतल्यावर तिच्या दुःखाची दुःसह तीव्रता हळूहळू कमी होत आली होती तसेंच तोंड खुपसून रडत रडत ती म्हणाली, "लहानपणापासूनची जेव्हांपर्यंतची आठवण करून पाहतें,—कधीं एक दिवससुद्धां तुमचं तोंड उतरलेलं दिसलं नव्हतं. तोंडावर अशी ही कळा आलेली केव्हांही पाहिली नव्हती. आतां नुसतं तुमच्या तोंडाकडं पाहिलं, कीं माझ्या काळजांत रावणाची चिता पेटूं लागते. हवं तर स्वतःकडे बघूं नका, माझ्याकडे एकवार नजर टाकून बघा. खरोखरच मला भिकारी बनवून शेवटीं रस्त्यावर कां सोडणार आहांत ? तुम्हाला तरी पहावेल का तें ? "

तरीही नीलांबरला उत्तर देण्याची स्फूर्ति होईना. बावळ्यासारखा तो तिच्या माथ्यावरचे केंस हातीं धरून चाळवीत बसला होता. इतक्यांत दाराच्या बाहेरून घरच्या अगदीं जुन्या मोलकरणीनं—सुन्द्रीनं हांक मारून विचारलें, "चुलींत विस्तव करूं का सुनबाई ?"

विराज घाबऱ्या घाबऱ्या उठली आणि पदरानें डोळे पुसून बाहेर येऊन उभी राहिली.

सुंद्रीनं पुनः विचारलें, "चुलींत विस्तव करूं ?"

बिराज चांचरत म्हणाली, "हो कर. तुझ्यासाठीं रांधायला हवं. मला आज जेवायचं नाहीं."

सुंद्री ही घरची जुनी मोलकरीण. आवाज चढवून नीलांबरला ऐकवीत ती म्हणाली, "रात्रीं जेवायचं मुळींच बंद केलंयस वाटतं तूं सूनबाई ? असं जेवण-खाण तोडून अर्धी होऊन गेलीयस तें दिसतं आहे का तुला ?"

तिचा हात धरून ओढीत विराज तिला स्वयंपाक घराकडे घेऊन गेली.

पेटत्या चुलीच्या जाळाचा प्रकाश विराजच्या चेहऱ्यावर पडला होता. जवळच बसून सुंदरी आ वासून तिच्याकडे पहात होती. एकदम ती म्हणाली, "खरोखरच सांगतें सुने, असलं हें तुझ्यासारखं रूप माणसाच्या जातींत कुठं दिसून येत नाहीं, राजेरजवाड्यांच्या घरांत सुद्धां असलं रूप कधीं दिसायचं नाहीं !"

तिच्याकडे तोंड वळवून विराज थोड्याशा रागावल्या आवाजांत म्हणाली, " राजेरजवाड्यांच्या घरांत तूं वावरत असतेस वाटतं ? "

सुंद्रीचें वय पस्तीस छत्तीस वर्षांचें होतें. एकेकाळीं देखणेपणाबद्दल तिची ख्याती होती. ती ख्याति अजूनसुद्धां अगदींच नाहींशी झाली होती असें नाहीं.

तिचें लग्न केव्हां झालें, ती केव्हां विधवा झाली, याची आपल्याला कांहीं आठवण नाहीं असें ती सांगत असे. पण सधवेच्या सौभाग्याला कांहीं ती अगदींच पारखी झालेली नव्हती. ती कृष्णापूरची राहणारी, ही देखील तिची एक मुख्यातीच होती.

विराजचा प्रश्न ऐकून ती हंसून म्हणाली, " राजेरजवाड्याचा घरचा थोडा-बहुत संबंध आहेच म्हणायचा सूनबाई. नाहींतर त्या दिवशीं त्याला केरसुणीनं झोडपून नसतं का काढलं ? "

आतां मात्र विराज खरोखरच रागावली. ती म्हणाली, " जेव्हां तेव्हां ती गोष्ट कशाला काढतेस तूं सुंद्री ? वाटेल तें बोलायचा त्यांना अधिकार आहे, तिथं तूं कसली मारझोड करणार आहेस ? अन् उगीच आम्हां लोकांना तूं कशाला ऐकवतेस तें ? आधींच त्यांची प्रकृति बरी नाहीं. त्यांच्या कानीं गेलं तर काय वाटेल त्यांना ? "

सुंद्री ओशाळून म्हणाली, " बाबूंना कशाला ऐकवायचं तें ? ही काय अशी-तशी गोष्ट आहे ? "

" ही अशीतशी गोष्ट नव्हे, हें तूं का मला सांगते आहेस ? शिवाय असं पहा, जें व्हायचं तें होऊन गेलं आहे, संपलं आहे, आतां ती गोष्ट पुनः काढायची गरच काय ? "

सुंदरी वस्कन म्हणाली, " होऊन गेलंय काय आणि संपलंय काय ?— कालच त्यानीं मला बोलावून नेलं होतं—"

विराज संतापून म्हणाली, " तूं गेलीस कां ? नोकरी करते आहेस माझ्या घरीं आणि जो हांक मारील त्याच्या मागं धांवत सुटतेस ! तीं सारीं माणसं कलकत्त्याला निघून गेलीं असं तूंच ना मला सांगितलंस ? "

सुंद्री म्हणाली, " खरोखरीच गेले होते ते. महिना दोन महिने गेले होते. आतां पाहिलं तें सारे आले आहेत. अन् तिकडे जायच्या बाबतींत म्हणशील तर मला असं सांग सूनबाई, शिपाई बोलवायला आला तर नाहीं म्हणायचं

कुठल्या तोंडानं ? ते आहेत या मुलखाचे जमीनदार, आम्ही गरीब रयत, कसल्या जोरावर त्यांचा हुकूम मोडायचा ?"

क्षणभर तिच्याकडे पहात विराज म्हणाली, "ते या मुलखाचे जमीनदार आहेत वाटतं ?"

सुंद्री हंसत हंसत म्हणाली, "होय तर सूनबाई, हा महाल त्यांनींच विकत घेतला आहे. बाबू मात्र तंबूंत राहतात. तुला खरंच सांगतें सूनबाई, राजपुत्र म्हणजे अगदीं राजपुत्र ! काय तोंड, काय डोळे !—"

तिला मधेंच थांबवून विराज म्हणाली, "थांब, थांब, पुरे झालं, असलं कांहीं विचारलं नव्हतं मी तुला—कुणी हें सांगितलं तुला ? सांग ना !"

यावेळीं सुंद्री मनांतल्या मनांत थोडी नाराज झाली; पण तें दिसूं न देतां रागाचा आव आणून ती म्हणाली, "कोण बोलणार आणि काय बोलणार ? बोलणं निघालं होतं तें सारं तुझ्याबद्दल."

हुंकार देऊन विराज उगीच राहिली.

यापूर्वीं हा प्रकार काय झाला, तें स्पष्ट करून सांगणें अवश्य आहे.

दोन वर्षापूर्वीं हा महाल कलकत्त्याच्या एका जमीनदाराच्या ताब्यांत आला. त्याचा धाकटा मुलगा राजेंद्रकुमार हा अत्यंत बदफैली आणि बदमाष माणूस होता. थोडेंबहुत कामकाजाला लावून त्याला मार्गावर आणावा म्हणून, विशेषतः त्याला कलकत्त्याच्या बाहेर घालवून देण्याच्या उद्देशानें, जवळपासचा एकादा महाल शोधून काढायला त्यानें सुरवात केली.

गेल्या वर्षीं तो या जागीं आला. रीतसर कचेरीची जागा नसल्यामुळें सप्त-ग्रामांतल्या नदीपलीकडच्या भागांत ग्रँट-ट्रंक-रोडच्या बाजूच्या एका आंबराईंत तंबू ठोकून त्यानें तिथें मुक्काम केला. हा राजकुमार या जागीं आल्यापासून आपल्या महालाचें कामकाज शिकेल अशी अपेक्षा होती; पण तसें कांहींच झालें नाहीं. पक्षांची शिकार करायची त्याला मोठी आवड होती. व्हिस्कीचें फ्लॅस्क पाठीवर टाकून, बरोबर चारपांच कुत्रे आणि बंदूक घेऊन, नदीच्या किनाऱ्यावरील जंगलांतून पांखरें मारीत तो सारखा भटकत असे.

अशा प्रकारें फिरत असतां पांच सहा महिन्यापूर्वीं एके दिवशीं संध्याकाळीं स्नान करून ओलेत्यानें जाणाऱ्या विराजवर त्याची नजर गेली. चारी बाजूंनीं मोठमोठे वृक्ष असल्यामुळें विराजचा हा थाट बाहेरून पाहणाऱ्याच्या नजरेला

येत नसे; म्हणून निःशंक मनानें घाटावर स्नान करून, कळशी भरून घेऊन ज्यावेळीं विराज निघाली त्यावेळीं रामोरच असलेल्या त्या माणसाशीं अकस्मात नजरानजर झाली. पाखराच्या मागें लागून तो या बाजूला आला होता.

जवळच असलेल्या समाधीच्या मोडक्या चौथऱ्यावर उभा राहून तो विराजकडे पाहूं लागला. माणसाच्या जातींत एवढें सौंदर्य असतें याची त्याला कल्पना सुद्धां नव्हती. खिळलेली नजर दूर करणें त्याला अशक्य झालें. चित्रांतल्या बाहुली-प्रमाणें या अतुलनीय आणि अपरिसीम सौंदर्याच्या मूर्तीकडे डोळयाचें पातें सुद्धां न हालवतां तो टक लावून पहात राहिला.

भिजलेलें वस्त्र कसेंबसें लपेटून घेऊन आंग झांकीत विराज झपाझप पावलें टाकीत तिथून निघून गेली. ताठरलेला राजेंद्र कांहीं वेळपर्यंत त्याच जागीं उभा राहून थोड्या वेळानें तिथून निघून गेला.

जातां जातां तो एकच विचार करीत होता, हें असें कसें घडलें ? चोंहीकडून जंगलानें वेढलेल्या, सुसंस्कृत समाजापासून पारख्या झालेल्या या लहानश्या खेड्यांत, अद्वितीय सौंदर्याची ही मूर्ति कशी निर्माण झाली ?

त्यानें तपासाला सुरवात केली. त्याच रात्रीं त्या सौंदर्यवतीचा पत्ता त्यानें काढला आणि तेव्हांपासून त्याला एक तिचेंच वेड लागलें. दुसऱ्या कोणत्याच विषयाकडे त्याचें लक्ष ठरेनासें झालें. आणखी एक दोन वेळ विराजशीं त्याची अशीच दृष्टभेट झाली.

विराज घरीं आली आणि सुंद्रीला हांक मारून म्हणाली, "त्या घाटावर जा पाहूं सुंदरी. परीस्थानावर कोण एक माणूस उभा आहे. त्याला जाऊन सांग—कीं आमच्या या बागेंत यापुढं केव्हांही पाऊल टाकूं नकोस."

त्याला हटकण्यासाठीं म्हणून सुंद्री आली होती; पण जवळ येऊन पाहतांच तिची गाळण उडाली. ती म्हणाली, "आपण का ते बाबू ?"

सुंद्रीच्या चेहऱ्याकडे पहात राजेंद्रानें प्रश्न केला, "तूं ओळखतेस का मला ?"

सुंद्री म्हणाली, "जी, होय बाबू. कोण आपल्याला ओळखीत नाहीं !"

"मी कुठं राहतों, माहीत आहे ?"

सुंद्री म्हणाली, "हो माहीत आहे."

राजेंद्र म्हणाला, "आज एक वेळ येशील का तिकडे ?"

सुंद्री लाजली. हंसत हंसत मान खालीं घालून तिनें हळूच विचारलें, " कशाला बाबू ? "

" काम आहे. एकदां येऊन जा—" असं म्हणून खांद्यावर बंदूक टाकून राजेन्द्र तिथून चालता झाला.

यानंतर सुंद्री बरेच वेळ तिकडे जात असे. नदीपार असलेल्या जमीदाराच्या कचेरींत जाऊन चोरून त्याची भेट घेत असे. त्यांची बरीच बोलाचाली होई; पण उगीच थोडीशी कल्पना देण्यापलीकडे विराजजवळ उघड उघड बोलायचें धैर्य तिला होत नसे.

सुंदरी मूर्ख नव्हती. विराज वहिनीला ती चांगली ओळखत होती. विराज बाहेरून कितीही प्रेमळ असली तरी अंतरंगांतून ती दगडासारखी कठोर होती, याची सुंदरीला पूर्ण जाणीव होती. विराजच्या अंगीं आणखी एक गुण होता—ती भयंकर धाडसी होती. माणसाचें असो, साप किरडवांचें असो, कीं भुताखेतांचें असो, भय म्हणजे काय असतें तें तिच्या खिसगणतींतसुद्धां नव्हतें. बहुधा याच कारणामुळें तोंड उघडून तिच्याकडे गोष्ट काढायला सुंदरीला धीर होत नसे.

चुलींतलीं लांकडें सारतांना मागं वळून पाहून विराज म्हणाली, " असं पहा सुंदरी, किती तरी वेळां तूं तिकडे गेलीस—आलीस—तुझीं बोलीभाषणं झालीं—पण त्यांतला एक शब्दसुद्धां सांगितला नाहींस मला. "

या अचानक प्रश्नामुळें सुंदरी पहिल्यानें बावरली; पण लगेच स्वतःला सांवरून घेऊन म्हणाली, " बोलीभाषणं झालीं असं कुणी सांगितलं तुला वहिनी ? "

विराज म्हणाली, " कुणी सुद्धां सांगितलं नाहीं. मला कळतं आपोआप. माझ्या डोक्याच्या मागं आणखी दोन दोन कान डोळे आहेत. आतां असं सांग, काल किती बक्षीस घेऊन आलीस ? दहा रुपये ? "

आश्चर्यानें सुंदरीची बोबडी वळली. तिचा चेहरा एकदम पांढरा फटक पडला. चुलीच्या अंधुक प्रकाशांत सुद्धां विराजला दिसून आलें, कीं ती बावरून गेली होती. काय उत्तर द्यावें हें तिला सुचत नव्हतें.

उगीच थोडेंसें हंसून विराज म्हणाली, " माझ्यासमोर तोंड उघडायला तुला धीर होत नाहीं. तुझ्या काळजांतला दगड तेवढा मोठा नाहीं. उगीच कशाला जातेस तिकडे ? कशाला पैसे उकळून शेवटीं बड्या माणसाच्या रागाला

बळी पडायचं साधन करतेस ? उद्यांपासून या घरांत पाऊल टाकूं नकोस. तुझ्या हातचं पाणी पायांवर घ्यायला सुद्धां मला किळस येईल ! तुझं सारं चरित्र आजवर मला माहीत नव्हतं. दोन दिवसांपूर्वी तें सुद्धां मला कळलं. आतां जा—पदराच्या गांठीला दहा रुपयांची नोट बांधून ठेवली आहेस ती परत दे. गरीब माणसाला शोभेल असं कांहींतरी आंग मोडून काम करून पोट भर. तरुणपणांत जें कांहीं केलंस तें आतां धुऊन जायचं नाहीं. आतां यापुढं दुसऱ्या चार माणसांचा सत्यानाश करायचं पाप तरी करूं नकोस ! ”

सुंद्री कांहीं तरी उत्तर देणार होती पण तिची जीभ टाळ्याला चिकटून गेली.

तें सुद्धां विराजच्या नजरेला आलें. ती म्हणाली, “ खोटं बोलण्यांत काय अर्थ आहे ? मी यांतलं कांहीं कुणाला सांगणार नाहीं. तुझ्या पदराच्या गांठीला बांधलेली नोट कुठून आली तें आधीं मला कळलं नव्हतं—पण आतां सारं कांहीं कळून चुकलं आहे. जा, आजपासून तुला नोकरीवरून काढलं आहे. उद्यांपासून माझ्या घरांत पाऊल टाकूं नकोस. ”

हा काय चमत्कार ! आश्चर्याचा जबरदस्त धक्का बसून बोबडी वळलेली सुंद्री तशीच बसून राहिली. या घरची आपली नोकरी गेली !— ही अशक्य गोष्ट कशी शक्य झाली, हें कांहीं केल्या तिच्या मनाला पटेना. कित्येक वर्षांपासूनची ती या घरची नोकर, विराजच्या लग्नांत ती हजर होती, तिनेंच हरिमतीला आपल्या अंगावर लहानाचं मोठें केलें, घरच्या मालकिणीबरोबर कितीतरी तीर्थयात्रा तिनें केल्या,—ती तर या घरचीच एक कुणीतरी होती !—विराजवहिनीनें आज तिला हें घर वर्ज्य करायचा हुकूम द्यावा ना ! रागानं तिचा गळा फुलून आला ! एका दमांत हजार उत्तरें द्यावीं असें तिला वाटलें. किती प्रकारचीं किती उत्तरें तिच्या जिभेच्या टोंकापर्यंत आलीं; पण तिच्या तोंडावाटे एक शब्द सुद्धां बाहेर पडला नाहीं. बावरल्यासारखी ती नुसती पहात राहिली.

मनांतल्या मनांत विराज सारें कांहीं समजली पण ती देखील कांहींच बोलली नाहीं. तिनें वळून पाहिलें तों हांडींतलें पाणी कमी झालें होतें. जवळच एका पितळेच्या कळशींत पाणी होतें, ती कळशी उचलून घेऊन ती आली. तितक्यांत तिला काय वाटलें कोण जाणे—एक क्षणभर थांबून कळशी खालीं ठेवून ती म्हणाली, “ नाहीं, तुझ्या हातच्या पाण्याला शिवलं तर अकल्याण होईल आमचं. याच हातानं तूं पैसे घेतले आहेस ते. ”

तिच्या या कडव्या शब्दांना उत्तर देण्याचें धैर्य सुंद्रीला झालें नाहीं.

विराजनें आणखी एक दिवा लावला, तें पाणी ओतून टाकून आणखी एक कळशी उचलून घेतली आणि त्या तशा रात्रींच्या काळयाभिट्ट काळोखांतून नदीचें पाणी आणण्यासाठीं ती आंबराईच्या रस्त्यानें निघून गेली.

विराज जायला निघाली तेव्हां तिच्या मागोमाग जावें, असें एक वेळ सुंद्रीच्या मनांत आलें; पण तो काळोख, ती अरुन्द पाऊलवाट, चारी बाजूला त्या भिंती, सप्तग्रामचा सर्वांना भेवडावणारा तो समाधीचा चौथरा, तें जुनंपुराणें वडाचें झाड, तो सारा देखावा नजरेसमोर येतांच, पायांपासून डोक्यापर्यंत तिच्या अंगावर थरारून कांटा उभा राहिला—" अग आई गऽ !—" असें तोंडांतल्या तोंडांत उद्गारून तिनें घाबरून तिथेंच बसकण मारली.

## ५

दोन तीन दिवसांनीं नीलांबर म्हणाला, " सुंद्री कुठं दिसत नाहीं ती विराज ? "

विराज म्हणाली, " मी तिला काढली नोकरीवरून. "

ती थट्टा आहे असं समजून नीलांबर म्हणाला, " छान केलंस. आतां सांग, पुढं काय झालं तिचं ? "

विराज म्हणाली, " आणखी काय व्हायचं तिचं ? मी खरोखरच तिला काढून टाकली. "

तरीही नीलांबरचा तिच्या शब्दावर विश्वास बसेना. अतिशय आश्चर्यचकित होऊन तिच्याकडे पाहून तो म्हणाला, " काय म्हणून तिला काढून टाकलीस ? चुका झाल्या असतील तिच्याकडून. पण इतक्या दिवसांची नोकर आहे ती, हें माहीत आहे ना तुला ? काय केलं तिनं ? "

विराज म्हणाली, " काढून टाकावं असं वाटलं म्हणून काढून टाकली. "

नीलांबर नाराज होऊन म्हणाला, " काढून टाकावं असं कां वाटलं, तें विचारतों आहें मी. "

नवऱ्याचा उद्देश विराजच्या ध्यानीं आला. क्षणभर मुकाट्यानें त्याच्या मुद्रेकडे पहात ती म्हणाली, " तिला काढून टाकावंसं मला वाटलं—मी काढून

टाकलं—तुम्हांला ठेवून घ्यावंसं वाटलं तर पुनः आणून ठेवा." असें म्हणून उत्तराची वाट न पाहतां ती स्वैपाकघरांत निघून गेली.

विराज रागावली आहे असें नीलांबरला वाटलें. तो जास्त कांहीं बोलला नाहीं. थोड्या वेळानं तो पुनः आला आणि स्वैपाकघराच्या दरवाजाबाहेर उभा राहून हळूच म्हणाला, "आतां काढून तर टाकलीस—पण आतां कामं कोण करील?"

आतां मात्र विराज मागें पाहून हंसली आणि म्हणाली, "तुम्ही!"

नीलांबर हंसला आणि म्हणाला, "दे तर मग तीं भांडीं! घांसून पुसून घेऊन येतों."

हातांतली विळी झट्कन् खालीं टाकून हात धुऊन विराज त्याच्यासमोर आली आणि त्याच्या पायाला हात लावून म्हणाली, "आतां इथनं जा पाहूं! थट्टा करायची सुद्धां सोय नाहीं. असंच आणखी कांहीं तरी बोलाल अन् तें ऐकलं तर पाप लागेल मला."

नीलांबर ओशाळून म्हणाला, "एवढ्यानंसुद्धां पाप लागतं का? तुझं हें पाप केव्हां कसं लागत नाहीं तें कांहीं मला कळत नाहीं विराज."

विराज म्हणाली सारं कांहीं कळतं तुम्हाला. नाहींतर एवढी कामं असतांना एवढीं भाडीं घांसायचीच गोष्ट काढली नसती तुम्हीं. जा आतां. उगीच उशीर लावूं नका. आंघोळ करून या. माझा स्वैपाक तयार आहे."

नीलांबर चौकीवर एकदम बसला आणि म्हणाला, "खरंच सांग विराज, हीं घरचीं सारीं कामं करणार कोण?"

विराज वर पाहून म्हणाली, "आहे कुठं काम? छोटी नाहीं. भावोजी नाहींत. काम कांहीं नाहीं म्हणून सारा दिवस बसून काढतें आहें. बरं झालं. काम अडून पडेल तेव्हां सांगेन तुम्हाला."

नीलांबर म्हणाला, "नाहीं विराज, तें चालायचं नाहीं. मोलकरणीचं काम तूं केलेलं मला खपायचं नाहीं. कांहींच चुकलं नाहीं सुंद्रीचं. खर्चाची काटकसर करायची म्हणून तूं तिला काढून टाकलीस. बोल, खरं कीं नाहीं?"

विराज म्हणाली, "नाहीं. खरंच नाहीं. खरोखरीच तिनं गुन्हा केला आहे."

"कसला गुन्हा?

" तें मी सांगणार नाहीं. जा आतां. उगीच बसून राहूं नका. आंघोळ करून या—" असें म्हणून विराज दरवाजाबाहेर निघून गेली.

थोड्या वेळानें ती परत आली तेव्हां नीलांबर तिथें तसाच बसून राहिला आहे असें पाहून म्हणाली, " हें काय ? अजून गेलां नाहींत ? अजून बसलां आहांत इथं ? "

नीलांबर काकुळतीला येऊन म्हणाला, " जातों. पण हें पहा विराज. हें पटत नाहीं मला. हीं असलीं हलकीं कामं तूं केलेलीं मला नाहीं आवडत. "

त्याचें भाषण ऐकून विराजला बरें वाटलें नाहीं. क्षणभर त्याच्याकडे पाहून ती म्हणाली, " मग काय करूं म्हणतां ? "

" सुंद्री नको असेल तर दुसरी कुणी तरी आण. एकटीच कशी राहणार तूं इथं ? "

" मी वाटेल तशी राहीन. मला दुसरं कुणी नको आहे इथं. "

नीलांबर म्हणाला, " नाहीं—तें चालायचं नाहीं. आपण संसारांत आहोंत तोंवर मला अपमानाची कदर केली पाहिजे. शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं ऐकलं तर काय म्हणतील ते ? "

विराज येऊन जवळ बसली आणि म्हणाली, " शेजारीपाजारी काय म्हणतील याचीच भीति वाटते आहे तुम्हाला ! माझं कसं चालेल—मला हाल काढावे लागतील—असं जें म्हटलं तें सारं ढोंग ! "

तो उद्गार नीलांबरला लागला. तिच्याकडे पाहून तो म्हणाला, " ढोंग ? "

विराज म्हणाली, " हो, हो, ढोंग ! आतां सारं कांहीं कळून चुकलं आहे मला. माझ्याकडे जरा पाहिलं असतं—माझ्या हालअपेष्टा ध्यानीं घेतल्या असत्या—माझं सांगणं जर यापूर्वीं ऐकलं असतं—तर आज ही दशा आली नसती. "

नीलांबर म्हणाला, " तुझं कांहींसुद्धां ऐकलं नाहीं मी ? "

विराज जोरजोरानं म्हणाली, " नाहीं. मुळींसुद्धां नाहीं. जेव्हां जेव्हां म्हणून कांहीं सांगितलं तेव्हां तेव्हां कांहीं ना कांहीं तरी बहाणा करून उडवून देत आलां. तुम्हांला काळजी आहे ती एवढीच—स्वतःला पाप लागेल ! खोटं नाटक करावं लागेल. लोकांत अपकीर्ति होईल. माझं काय होईल याची एकदां सुद्धां कदर केली नाहीं. "

नीलांबर म्हणाला, " तुझं पाप तें तुझंच पाप ना ? माझी अपकीर्ति झाली तर ती तुझीच अपकीर्ति नव्हे का ? "

आतां मात्र विराज खरोखरच रागाला आली. चिरडीला येऊन ती म्हणाली, " हें पहा, हें खेळवणं आतां पुरे झालं. असल्या चाळवणीला फसायला मी आतां कुकुलं बाळ नाहीं—" क्षणभर उगीच राहून ती म्हणाली, " तुम्हाला केवळ आपली काळजी लागली आहे. आणखी कांहींच दिसत नाहीं तुम्हाला. आतां या अशा एवढ्या हालअपेष्टा आल्या तेव्हां हे शब्द तोंडावाहेर काढावे लागले मला. स्वतःच्या घरीं आज मी मोलकरणीचं काम करतें आहें याची तुम्हाला लाज वाटते. पण उद्यां जर तुमचं कांहीं बरंवाईट झालं—अन् परवां अन्नाच्या दोन घांसासाठीं मला दुसऱ्या कुणाच्या घरीं मोलकरणीचं काम करावं लागलं तर त्याचं काय ? हो, खरंच, त्यावेळीं तुम्हाला तें कांहीं डोळयांनीं दिसायचं नाहीं, कानांनीं ऐकूं यायचं नाहीं, अर्थातच तेव्हां कसली लाज वाटायला नको कीं काळजीही करायला नको ! असंच ना ? "

या आरोपाचें उत्तर चट्कन् देणें नीलांबरला कठीण गेलें. बराच वेळ तो खालीं जमिनीकडे पहात बसला होता. नंतर वर तिच्याकडे पाहून शांतपणें तो म्हणाला, " हें तूं बोलते आहेस तें मनापासून नव्हे हें मला कळतं. क्लेश काढावे लागताहेत त्या रागानं बोलते आहेस. स्वर्गात असलों तरी सुद्धां तुला क्लेश पडलेले तिथं माझ्यानं पाहवणार नाहींत, हें तूं पक्कं जाणतेस. "

विराज म्हणाली, " पूर्वीं तें जाणवत होतं. पण क्लेश म्हणजे काय तें क्लेश झाल्याशिवाय जसं नीट कळून येत नाहीं, तसंच प्रसंग आल्याशिवाय पुरुष माणसाला दयामाया असते कीं नाहीं तेंही कळून येत नाहीं. भर दुपारीं मला तुमच्याबरोबर रागारागी करायची नाहीं. मी सांगतें तें ऐका. जा आतां आंघोळ करून या. "

नीलांबर " जातों " असें म्हणाला खरा पण तसाच उभा राहिला.

विराज पुनः म्हणाली, " माझ्या छोटीचं लग्न होऊन आज दोन वर्षं झालीं. त्यापूर्वीपासून आजपर्यंतच्या साऱ्या गोष्टी मी चांगल्या पडताळून पाहिल्या—एकदां सुद्धां तुम्हीं माझं ऐकलं नाहीं. जेव्हां जें कांहीं बोललें तें सारं उडवून देऊन तुम्हीं स्वतःला जें वाटलं तें करीत आलां लोक घरच्या नोकरचाकराचं सुद्धां वेळींप्रसंगीं ऐकतात; पण तेवढा सुद्धां माझा बोज तुम्हीं ठेवला नाहीं. " नीलांबर कांहींतरी उत्तर देणार होता तोंच त्याला थांबवून विराज म्हणाली, " नाहीं, नाहीं, तुमच्याशीं मला वाद घालायचा नाहीं. आज बोलण्यावरून बोलणं आलं नसतं तर तुम्हाला कांहींच कळलं नसतं. केवळ मला

किळस आला. तुम्हांला एक शब्द सुद्धां बोलायचा नाहीं म्हणून देवाचं नांव घेऊन मी कसा निश्चय केला होता तें कशाला बोलूं ? आतां कदाचित् तुम्हाला आठवत नसेल. पूर्वी लहानपणीं डोकं दुखतं म्हणून मी झोंपून गेलें होतें. दार उघडायला उशीर झाला म्हणून तुम्हीं मला मारायला उठलां होतां. माझं दुखणं तुम्हाला खरं वाटलं नाहीं—त्याच दिवशीं मी शपथ घेतली, दुखण्याची गोष्ट तुम्हाला सांगायची नाहीं. आजपर्यंत ती शपथ मी मोडली नाहीं. "

नीलांबरनें वर पाहिलें. उभयतांची नजरानजर होऊन गेली. एकदम उठून विराजचे दोन्ही हात कडकडून धरून तो उद्विग्न होऊन म्हणाला, " हें बरं नव्हे विराज. आधींच तुझी प्रकृति बरीशी नाहीं. आतां काय झालं आहे तें मला सांग पाहूं—सांगितलंच पाहिजेस. "

हळू हळू त्याचा हात सोडवून घ्यायचा प्रयत्न करीत विराज म्हणाली, " सोडा. लागतंय्—"

" लागूं दे—सांग—काय झालंय ? "

कोरडें हंसें हंसत विराज म्हणाली, " कुठं काय ? कांहीं झालं नाहीं मला. चांगली धडधाकट आहें. "

नीलांबरला तें पटलें नाहीं. तो म्हणाला, " नाहीं. खास तुझी प्रकृति बरी नाहीं. नाहींतर किती वर्षांपूर्वीची ती गोष्ट काढून तूं माझ्या दुःखावर डागण्या दिल्या नसल्यास !—विशेषतः मी हजार वेळां या बाबतींत तुझी माफी मागितली असतांना तूं ती गोष्ट पुनः काढली नसतीस. "

" बरं आहे. आतां यापुढं केव्हांही ती गोष्ट काढणार नाहीं—" असं म्हणून हात सोडवून घेऊन ती बाजूला सरकली.

तिच्या उद्गाराचा उद्देश नीलांबरला कळला पण तो त्यावर कांहीं बोलला नाहीं. दोन तीन मिनिटं उगीच बसून राहून नंतर तिथून उठून तो निघून गेला.

रात्रीं दिव्याजवळ बसून विराज पत्र लिहीत होती. खाटेवर पडल्या पडल्या नीलांबर स्वस्थपणें तिच्याकडे पहात असतां मधेंच एकदम म्हणाला, " या जन्मीं तुझ्या हातून कांहीं दोष घडल्याचं तुझ्या वैऱ्याला सुद्धां ठरवतां यायचं नाहीं. पूर्वजन्मीं तूं पाप केलं होतंस, नाहींतर केव्हांच हें असं झालं नसतं. "

विराजनं वर पाहिलें आणि विचारलें, " काय झालं नसतं ? "

नीलांबर म्हणाला, " देवानं तुझा देह, तुझं मन, असं कांहीं घडवलं आहे, कीं तें राजाच्या राणीलाच शोभेल. पण—"

" पण काय ? "

नीलांबरनं उत्तर दिलें नाहीं. उत्तराची अपेक्षा करीत क्षणभर थांबून विराज कोरड्या भाषेनें म्हणाली, " देवानं हें केव्हां येऊन सांगितलं तुम्हाला ? "

नीलांबर म्हणाला, " कानाडोळ्याच्या साऱ्या माणसांना देव केव्हांही येऊन सांगतो. "

" हूं " म्हणून विराज पुनः पत्र लिहूं लागली. कांहीं वेळ उगीच राहून नीलांबर पुनः म्हणाला,—" मी तुझं कांहींच ऐकत नाहीं असं तूं म्हणालीस—तें खरंही असेल; पण हा माझा एकट्याचाच दोष का ? "

विराजनं पुनः वर पाहिलें आणि म्हटलें, " बरं आहे. मग माझा दोष माझ्या पदरांत घाला ना. "

नीलांबर म्हणाला, " उगीच तुझा दोष कशाला काढूं ? पण आणखी एक खरं खरं सांगायचं आहे मला. तूं आपल्याबरोबर दुसऱ्याची तुलना करून पहातेस. पण तुझ्यासारख्या बायका एकाद्या निर्बुद्ध मूर्खाच्या हातीं कशा पडतात हें एकदां सुद्धां ध्यानांत घेत नाहींस. म्हणूनच म्हणतों, कीं हें तुझ्या पूर्वजन्मींच्या पापाचं फळ. नाहींतर कशाला तुला अशा हालअपेष्टा भोगाव्या लागल्या असत्या ! "

विराज मुकाट्यानें पत्र लिहीत होती. यावर कांहीं उत्तर देऊं नये असें क्षणभर तिला वाटलं असावें. पण तिच्यानें राहवलें नाहीं. मान वळवून तिनें प्रश्न केला, हें सारं कांहीं ऐकून मी खूष होईन असं का वाटलं तुम्हाला ? "

" कुठलं सारं कांहीं ? "

विराज म्हणाली, " हें जें आतां बोललांत—राजाची राणी झालें असतें—तुमच्या हातीं पडून ही अशी झालें—हें सारं कांहीं. हें सारं ऐकलं, कीं मला मोठा आनंद होईल असं का तुम्हाला वाटलं ? असं बोलणाऱ्याच्या तोंडाकडे पुनः पहावं असं कधीं वाटेल का मला ? "

नीलांबरला वाटलें, विराज चांगलीच संतापली आहे. प्रकरण इतक्या विकोपाला जाईल असें त्याला वाटलें नव्हतें म्हणून तो मनांतल्या मनांत ओशाळून गेल्यासारखा झाला. कोणत्या प्रकारें उत्तर दिलें म्हणजे तिला बरें वाटेल याची कल्पना त्याला सहसा करतां येईना.

विराज उद्गारली, " रूप ! रूप ! रूप ! ऐकतां ऐकतां माझे कान किटले. दुसरे कुणी म्हणतात—त्यांना कदाचित् सर्वापेक्षां हें रूपच डोळ्यांत भरतं. पण तुम्हीं माझे पती—एवढीशी होतें तेव्हांपासून तुमच्या सहवासांत एवढी मोठी झालें—तुम्हाला सुद्धां याच्या पलीकडे काहीं दिसत नाहीं का ? हीच का माझी सर्वापेक्षां मोठ्यांतली मोठी कमाई ? कसं तुमच्यानं असं बोलवतं ? मी काय या रूपाचा विक्रा करतें आहें, कीं याच्याच जोरावर तुम्हाला भुलवून ठेवतें आहे ? "

नीलांबर फार घाबरला. अत्यन्त अस्वस्थ होऊन तो म्हणाला, " नाहीं—नाहीं—तसं नाहीं—"

विराज मध्येंच तोंड घालून म्हणाली, " तेंच आहे ! मी काळी-कुरूप असतें वर तुम्हाला आवडलें असतें का, असं मी तुम्हाला एकदां विचारलं होतं तें यामुळंच. आठवतं का ? "

मानेनं होकार देत नीलांबर म्हणाला, " आठवतं. पण तूंच तर त्यावेळीं म्हणाली होतीस—"

विराज म्हणाली, " हो, म्हणालें होतें—काळी, कुरूप असतें तरीही आवडलें असतें ! कां !—लग्न लागलं आहे ना माझ्याबरोबर ! गृहस्थाघरची मुलगी, गृहस्थाघरची सून, लाज नाहीं वाटत असलं कांहीं बोलतांना माझ्यासमोर ? यापूर्वीं सुद्धां तुम्हीं असं बोललां होतां—" बोलतां बोलतां रागाच्या आवेशांत तिच्या डोळ्यांतून आसवें गळूं लागलीं. दिवलीच्या प्रकाशांत तीं क्षणभर चमकून गेलीं.

नीलांबरनं तें पाहिलें, घाईघाईनं उठून त्यानं तिचा हात धरला.

विराजच केव्हां तरी एकदां म्हणाली होती—त्यानं हात धरला कीं तिचा राग वितळून जातो.

नीलांबरला तेंच आठवलें. म्हणूनच जवळ येऊन त्यानं तिचा उजवा हात आपल्या दोन्हीं हातांत धरला आणि अगदीं तिच्या जवळ जाऊन तो मुकाट्यानं बसला.

डाव्या हातानं विराजनं आपल्या डोळ्यांतलीं आसवें पुसून टाकलीं.

त्या रात्रीं कितीतरी वेळपर्यंत दोघेंही एकमेकाशीं बोलल्याशिवाय जागींच राहिलीं होतीं. एकदां मधेंच नीलांबरनं तिच्याकडे तोंड वळवलें आणि हलकेच म्हटलें, " आज एवढी रागाला कां आलीस विराज ? "

विराजनें उत्तर दिलें, "असं हें कांहींतरी कां बोललां तुम्हीं ?"

नीलांबर म्हणाला, "मी कांहीं वाईट बोललों नाहीं—"

विराज एकदम चिरडीला आली. अधीरपणानें म्हणाली, "तरी सुद्धां म्हणतां, कीं वाईट नव्हे म्हणून ! हेंच तें वाईट बोलणं. अगदीं वाईट, अत्यंत वाईट ! एवढ्यासाठींच तर सुंद्रीला—"

ती पुढें बोलली नाहीं. उगीच राहिली.

क्षणभर थांबून नीलांबर म्हणाला, "एवढ्यासाठींच का तिला घालवून दिलंस ?"

"हूं" म्हणून विराज स्वस्थ राहिली. नीलांबरनें यावर प्रश्न केला नाहीं त्यावेळीं विराज स्वतःच म्हणाली, "हें पहा, उगीच जिकिर करूं नका, मी कांहीं कुकुलं बाळ नाहीं. बरं वाईट मला कळतं. घालवून लावण्याजोगा अपराध घडला म्हणूनच तिला घालवून लावलं. तुम्हीं पुरुषमाणसांनीं असल्या तपशीलांत न पडलेलं बरं."

"नको. मला नकोच तो तपशील ऐकायला—" असं म्हणून एक मोटा सुस्कारा सोडून नीलांबर पाठ फिरवून झोपीं गेला.

विभक्त झाल्यानंतर दोन-चार दिवसांनीं धाकटा भाऊ पीतांबर यानें घराच्या मध्यभागीं कळकीच्या कामट्यांची सारवलेली भिंत घालून आपला भाग निराळा करून घेतला होता. उजव्या बाजूला दरवाजा काढून त्याच्या समोरच त्यानें लहानसा बैठकखाना केला होता. त्यांत सर्व प्रकारच्या वाडबिछायती ठेऊन देऊन झकपक केलेल्या त्या जागेंत मोठ्या आरामांत तो आयुष्य कंठीत होता. केव्हांही कोणत्याही कारणानें दादाशीं भाषण करायचें त्यानें वर्ज्य केलें होतें. अशाप्रकारें त्या दोघांचा परस्पर संबंध एकदम तुटून गेलेला होता.

इकडे विराजला सारा दिवस एकटं रहावें लागत होतें. सुन्द्रीला घालवून दिल्यापासून सारें घरकाम तिलाच करावें लागत होतें. एवढेंच नव्हें तर जें सारें काम पूर्वीं मोलकरीण करी तें करण्यासाठीं लोकलाजेमुळें लोकांच्या नजरेआड तें काम करण्यासाठीं तिला मोठ्या रात्रींपर्यंत जागत रहावें लागे.

एके दिवशीं अशीच ती या कामांत गुंतलेलीं असतांना एकाएकीं पलीकडच्या भागांतून कळकीच्या भिंतीच्या भेगेंतून हलकेच हांक आली—"रात्र फार झाली नाहीं का जाऊबाई ?"

विराजनें दचकून पाहिलें. जिनें हांक मारली होती ती पुनः तशीच हलकेच म्हणाली, " मी ती मोहिनी."

विराज आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " कोण ? धाकटी सून ? एवढ्या रात्रीं ? "

" होय जाऊबाई मी. जरा इकडे जवळ या."

विराज बेड्याजवळ आली तेव्हां धाकटी सून हळूच म्हणाली, " भावजी झोंपी गेले आहेत ना जाऊबाई ? "

विराज म्हणाली, " हो. "

मोहिनी म्हणाली, " एक सांगायचं आहे जाऊबाई—पण कसं सांगूं ? " असें म्हणून ती स्तब्ध राहिली.

तिच्या बोलण्याच्या आवाजावरून विराजला कळून चुकलें, कीं ती रडत असावी. चिंतींत होऊन तिनं प्रश्न केला, " काय झालं आहे सूनबाई ? "

लगेच उत्तर देणें मोहिनीला कठीण गेलं असावें. पदरानं डोळे पुसून ती स्वतःचें मन सांवरून घेत आहे असं विराजला वाटलें.

विराज उद्विग्न होऊन म्हणाली, " काय झालं मोहिनी ? "

गहिंवरल्या आवाजानं ती म्हणाली, " भावजीवर दावा मांडला आहे. बहुतेक उद्यां समन्स निघेल. काय होणार आहे जाऊबाई ? "

विराज घाबरली. स्वतःची मनःस्थिति बाहेर न दिसूं देतां ती म्हणाली, " समन्स निघणार आहे ना ? त्यांत भ्यायचं कशाला सूनबाई ? "

" खरंच का जाऊबाई ? भ्यायला नको ? "

विराज म्हणाली, " त्यांत कसलं भय ? पण दावा कुणी मांडला आहे हा ? "

मोहिनी म्हणाली, " भुलू मुखर्जीनं."

विराज क्षणभर स्तंभित होऊन स्वस्थ राहिली. ती म्हणाली, " जाऊं दे. नको त्या गोष्टी ! मला कळलं. मुखर्जीकडून यांनीं कर्ज काढलं होतं. त्यासाठींच दावा केला असेल कदाचित्. त्यांत भ्यायचं कांहीं कारण नाहीं सूनबाई."

दोघीही क्षणभर उगीच राहिल्या. थोडया वेळानें मोहिनी म्हणाली, "जाऊबाई, मन मोकळं करून तुमच्याशीं बोलायला कधींच मिळालं नाहीं—तसं बोलायची माझी लायकीही नाहीं—आज धाकट्या बहिणीचं एक मागणं ऐकाल ? "

तिचें भाषण ऐकून विराज गहिंवरली. अधिकच गळा दाटून ती म्हणाली, " मागणं कसं ऐकणार नाहीं ताई ? "

" तर मग हात पुढं करा."

विराजनें हात पुढं करतांच बेड्याच्या सांदींतून एक नाजूकसा हात बाहेर आला आणि त्यानं तिच्या हातीं एक एकसर सोन्याची माळ टाकली.

विराज आश्चर्यचकित होऊन म्हणाली, " हं काय मोहिनी ? "

आवाज आणखी खालीं उतरवून मोहिनी म्हणाली, " ही विकून टाका, गहाण ठेवा, कांहींतरी करून तें देणं देऊन टाका जाऊबाई."

या आकस्मिक, अयाचित आणि अनपेक्षित सहानुभूतीमुळें विराज क्षणभर थक्क होऊन राहिली. तिच्या तोंडून शब्द निघेना.

" मग जातें जाऊबाई." असें म्हणून ती जाते आहे असें पाहून विराजनें घाईघाईनें हांक मारली आणि म्हटलें, " जाऊं नकोस—थांब—ऐक."

मोहिनी पुनः येऊन म्हणाली, " काय जाऊबाई ? "

त्या फटींतून तेव्हांच माळ पलीकडे फेंकून देऊन विराज म्हणाली, " नाहीं. हं असलं कांहीं बरं नव्हे."

पडलेली माळ उचलून घेऊन मोहिनीनें विचारलें, " कां बरं नव्हे ? "

विराज म्हणाली, " भावजींना कळलं तर ते काय म्हणतील ? "

" पण त्यांना यांतलं कांहीं कळायचंच नाहीं ना ? "

" आज नाहीं उद्या, केव्हां तरी कळलं तर काय होईल ? "

मोहिनी म्हणाली, " केव्हांच कळायचं नाहीं त्यांना जाऊबाई. गतवर्षी माझ्या आईनं मरतांना गुपचुप मला ही माळ दिली. तेव्हांपासून मी ती केव्हांच गळ्यांत घातली नाहीं कीं बाहेर सुद्धां काढली नाहीं. तुमच्या पाया पडतें मी जाऊबाई—एवढी घ्याच."

तिच्या या काकुळतीमुळें विराजच्या डोळ्यांतून आसवांच्या धारा वाहूं लागल्या. रक्ताचा कांहींच संबंध नसतां ही एवढी तळमळते आणि एका उदरांतून जन्माला आलेले हे दोघे भाऊ !—त्यांची तुलना करून पाहतांना तिला चमत्कारिक वाटलें. हातांनीं डोळे पुसून दाटलेल्या आवाजानें ती म्हणाली, " मरेपर्यंत ही आजची हकीगत मी विसणार नाहीं ताई. पण ही माळ मला घेतां येत नाहीं. नवऱ्याला नकळत कोणतीही गोष्ट

वायकोनं करणं बरं नव्हे सूनबाई. त्यांत तुला अन् मला दोघांनाही पाप लागेल."

मोहिनी म्हणाली, "तुम्हाला सारी हकीकत माहीत नाहीं म्हणून असं म्हणतां—पाप पुण्य मला सुद्धां कळतं जाऊबाई—पण मरणकाळीं मी तरी काय जवाब देऊं ?"

विराजनें पुनः एकदां डोळे पुसले, मन घट्ट केलं आणि म्हटलें, "साऱ्यांची ओळख मला पटली होती सूनबाई, इतक्या दिवसांत ओळखलं नव्हतं काय तें तुला. मरणकाळीं कसलाच जबाब तुला द्यायला नको आहे. तुझ्या अंतरींच्या परमेश्वरानं इतक्यांत तो जबाव लिहून सुद्धां घेतला आहे. जा आतां—रात्र झाली—आतां नीज जा—" असें म्हणून तिला पुनः बोलायला अवसर न देतां विराज झट्कन् तिथून निघून गेली.

पण खोलींत जायला तिचें मन घेईना, पडवीच्या एका कोंपऱ्याला अंगावरचें अर्धे लुगडें आंथरून ती आडवी झाली.

दावा-दरखास्तीची गोष्ट कांहीं यावेळीं तिच्या मनांत आली नाहीं. पण त्या हवल्याशा छोट्या जावेच्या तोंडचे ते केविलवाणे शब्द आठवून तिच्या दोन्ही डोळ्यांतून सारखा पाझर सुरू झाला.

इतके दिवस शेजारीं राहून सुद्धां तिची ओळख पटली नाहीं—ओळख पटवून घ्यायचा आपण प्रयत्न केला नाहीं—तिच्या पाठीमागें तिची निंदा केली नाहीं, खरी—पण कधींही तिच्याबद्दल एक चांगला शब्द तोंडांतून काढला नाहीं, हेंच तिच्या मनाला लागून गेलें.

आकाशांतून पडतांना चमकणाऱ्या विजेचा प्रकाश एका निमिषांत जसा काळोखाला चिरून काढतो, त्याचप्रमाणें धाकट्या जावेच्या त्या वागणुकीनें खालच्या तळापर्यंत तिचें हृदय चिरून काढलें. विचार करीत करीत रडत रडत केव्हां कशी झोंप लागली तें तिला कळलें सुद्धां नाहीं.

एकाएकी कुणाचा तरी हात लागला असें वाटून ती धडपडून उठून पाहते तों नीलांबर येऊन तिच्या उशाशीं बसला होता. अगदीं थोडक्यांत म्हणाला, "चल, आंत चल. रात्र संपत आली."

कांहीं न बोलतां त्याला बिलगून विराज उठली आणि मुकाट्यानें खोलींत येऊन निर्जीवपणें झोंपी गेली.

# ६

एक वर्ष निघून गेलें. या वर्षी पीक दोन आणे सुद्धां आलें नाहीं. ज्या जमिनीच्या उत्पन्नावर उभ्या वर्षाचें भरणपोषण होऊं शकत होतें, त्यांतला बराचसा मोठा भाग शेजारच्या गांवच्या मुखर्जीनीं खरेदी करून घेतला. घरसुद्धां गहाण पडलें होतें—तें धाकटा भाऊ पीतांबर यानें गुपचुप स्वतःच्या नांवानें फिरवून घेतलें. तें सुद्धां एकमेकांना कळून आलें.

गोठ्यांतली एकटीच गाय मरून गेली. कडक उन्हानें तळें वाळून भेगा पडल्या. विराजला कुठेंच कांहीं आधार दिसेना. देहाचा एकादा भाग बराच वेळपर्यंत बांधून ठेवला म्हणजे जशा असह्य आणि अव्यक्त अशा बारीक वेदना उत्पन्न होऊन सारा देह हळूहळू गळून जातो, त्याचप्रमाणें साऱ्या संसाराशीं असलेला आपला संबंध कोमळत चालला आहे असें तिला वाटूं लागलें.

पूर्वीं ती उठल्यासुटल्या हंसत असे. शब्दाशब्दावर कोट्या करून थट्टा करीत असे; पण आतां कुणाशीं बोलावें म्हटल्यास घरांत चिटपाखरूंसुद्धां नव्हतें. कुणी कधीं भेटायला आलेंच, चौकशी करूं लागलें, तर ती मनांतल्या मनांत नाराज होत असे. तिचा स्वभाव मानी होता. शेजाऱ्याच्या एखाद्या शब्दानें सुद्धां ती एकदम उसळून उठे. तिच्या घरकामाकडे कुणी नजर देऊन पाहिलें असतें, तर संसाराच्या बाबतींत तिला एवढासुद्धां उत्साह राहिलेला नाहीं असें त्याला दिसून आलें असतें.

घरांतले बिछाने मळके झाले होते. कापडचोपड घडी करून सुद्धां ठेवलेलें नव्हतें. घरांतल्या जिनसावर धुरळा सांचला होता. झाडून काढलेल्या कचऱ्याच्या राशी कोंपऱ्यांत पडून राहिलेल्या दिसत होत्या. त्या उचलून बाहेर टाकून देण्याइतपतसुद्धां ताकद ओढूनताणून आणणेंही तिला अशक्य झालें होतें.

अशाप्रकारें दिवसांवर दिवस चालले होते. या मुदतींत धाकटी बहीण हरिमती हिला माहेरवासासाठीं आणण्याचा नीलांबरनें दोन वेळ प्रयत्न केला. त्यांनीं तिला पाठवली नाहीं. पंधरा दिवस वाट पाहून त्यानें एक पत्र लिहिलें पण हरिमतीच्या सासऱ्यानें त्याचें उत्तरसुद्धां दिलें नाहीं.

या बाबतींत विराजसमोर एक शब्द सुद्धां काढणें कठीण होतें. नुसतें नांव

काढलें तर ती एकदम भडकून उठे. छोटीला तिनेंच लहानाची मोठी केली होती. पोटच्या पोराप्रमाणें कोडकौतुक केलें होतें. पण आतां तिच्या हिशेबीं छोटीचा संपर्क सुद्धां विषासारखा होऊन बसला होता.

त्या दिवशीं सकाळीं गांवच्या पोस्ट ऑफिसांत चक्कर मारून, उतरल्या चेहऱ्यानें घरीं येऊन नीलांबर म्हणाला, " छोटीच्या सासऱ्यानं एका शब्दानं सुद्धां उत्तर पाठवलं नाहीं. या पूजेच्या दिवसांत सुद्धां बहिणीचं दर्शन होण्याचं लक्षण दिसत नाहीं. " काम करीत असतांना विराजनें वर नजर करून पाहिलें. बोलण्यासाठीं तिचे ओंठ उघडले गेले. पण तितक्यांत पुनः तोंड मिटून कांहीं न बोलतां ती निघून गेली,

त्या दिवशीं दुपारीं जेवायला बसल्यावेळीं नीलांबर हळूच म्हणाला, " तिचं नांव काढलं तर तूं भडकून उठतेस. तिचा बिचारीचा काय दोष ? "

विराज जवळच बसली होती. ती नजर वळवून म्हणाली, " भडकून उठतें म्हणून म्हणतं कोण ? "

" दुसरं कोण म्हणणार ? मी प्रत्यक्ष पाहतों आहें. "

नवऱ्याच्या चेहऱ्याकडे क्षणभर पहात राहून नंतर विराज म्हणाली, " पहात आहां ना ? छान ! " असे उद्गार काढून ती उठून जात होती.

तिला हांक मारून नीलांबर म्हणाला, " आजकाल तुला असं झालंय काय ? तूं अगदींच अशी बदलून गेलीस कशी ? "

विराज थांबून मागें वळली. त्याचें बोलणें चांगलें ऐकून घेतलें. आणि म्हणाली, " बदलायला लावलं, कीं माणूस बदलून जातं—" असें म्हणून ती बाहेर निघून गेली.

यानंतर दोन तीन दिवसांनीं तिसऱ्या प्रहरीं नीलांबर चंडीमंडपांत एकटाच बसून कसलें तरी गाणें गुणगुणत होता. विराज येऊन त्याच्यामागें कांहीं न बोलतां थांबली आणि जवळ येऊन उभी राहिली.

नीलांबरनें वर पाहून म्हटलें " काय आहे ? "

विराज त्याच्याकडे नुसती रोखून पहात उभी राहिली. त्याच्या प्रश्नाचें उत्तर तिनें दिलें नाहीं.

नीलांबरनें पुनः मान खालीं घालतांच विराज कठोरपणानें म्हणाली, " पुन एकदां असं तोंड वर करून पहा पाहूं. "

नीलांबरनें वर पाहिलें नाहीं कीं प्रश्नाचें उत्तर दिलें नाहीं. तो मुकाट पहात राहिला.

तितक्याच कठोरपणानें विराज म्हणाली, " डोळे अगदीं गुलाबी झालेले दिसताहेत. पुनः ती सुरवात झाली वाटतं ? "

नीलांबर कांहींच बोलला नाहीं. घाबरून नजर खालीं वळवून लाकडी पुतळीसारखा स्वस्थ बसून राहिला, पूर्वींपासूनच त्याला तिची जरब वाटत असे. अलीकडे अलीकडे विराज भडकल्या दारूसारखी अशी कांहीं चमत्कारिक होऊन बसली होती, कीं कशामुळें ती केव्हां भडकून उठेल तें कुणाला कांहींच सांगतां आलें नसतें.

कांहीं वेळ तशीच उभी राहून नंतर ती म्हणाली, " चांगलं चाललंय ! गांजा पिऊन भांग चढवून बं-भोला होऊन बसायची वेळ हीच आहे खरी—" असें म्हणून ती घरांत निघून गेली.

तो दिवस गेला. त्याच्या दुसऱ्या दिवशीं सारी लाजलज्जा सोडून नीलांबर पीतांबरकडे गेला आणि त्याला हांक मारून बाहेर बोलावून म्हणाला, " छोटीच्या सासऱ्यानं पत्राचं उत्तरसुद्धां पाठवलं नाहीं. आतां तूं एकदां प्रयत्न करून पहा. तुझ्या शब्दानं तरी एकदांची दोन दिवसांसाठीं तरी बहीण माहेरीं येते कीं काय पहा. "

दादाच्या तोंडाकडे पाहून पीतांबर म्हणाला, " तुम्ही हजर असतांना मी काय करणार ! "

त्याची लबाडी ध्यानीं येऊन नीलांबर मनांतल्या मनांत चिडला खरा; पण तो मनींचा भाव शक्य तेवढा मनांत दाबून तो म्हणाला, " तें खरं. ती जशी माझी, तशीच तुझीही बहीण आहे. घटकाभर धरून चाल, कीं मी मेलोंय्, आतां तूं एकटाच मागं राहिला आहेस—"

पीतांबर म्हणाला, " जें घडलं नाहीं तें घडल्याची कल्पना तुम्हाला करतां येते. मला ती करतां येत नाहीं. जिथं तुमच्या पत्राला त्यांनीं उत्तर दिलं नाहीं तिथं मला विचारतो कोण ? "

धाकट्या भावाचें हें उत्तरसुद्धां मुकाट्यानें ऐकून घेऊन नीलांबर म्हणाला, " जें घडलं नाहीं तें मी खरं मानतों ? ठीक. तसं म्हण हवं तर. एवढ्यासाठीं तुझ्याबरोबर मला झगडा करायचा नाहीं. माझ्या पत्राला तो उत्तर देत नाहीं त्याचं कारण वेगळं. लग्नाच्या वेळीं कबूल केलेल्या साऱ्या अटी मला

पाळता आल्या नाहींत; पण या साऱ्या बाबींची चर्चा करायला कांहीं मी तुला बोलावलं नाहीं. मी सांगितलं तें काम करणार आहेस कीं नाहींस सांग ! "

पीतांबर मान हलवून म्हणाला, " नाहीं. लग्नाच्या पूर्वी मला विचारलं होतं ?"

" विचारलं असतं तर काय झालं असतं ? "

पीतांबर म्हणाला, " मी यो य सल्ला दिला असता. "

नीलांबरच्या मस्तकांत आग भडकून उठली. त्याचे ओंठ थरथर कापूं लागले. तरीही मन आवरून तो म्हणाला, " तर मग तूं माझं ऐकणार नाहींस ? "

पीतांबर म्हणाला, " नाहीं. छोटीचा सासरा काय आणि माझा स्वतःचा सासरा काय, दोघेही वडीलमाणूस. त्यांनीं पाठवायचं मनांत आणलं तर पाठवतील. नाहीं पाठवलं तर त्यांच्याविरुद्ध बोलणं माझ्याकडून होणार नाहीं. तो माझा स्वभाव नाहीं. "

त्याचें हें भाषण ऐकतांच नीलांबरला एकदा असं वाटलें—सरळ जाऊन दोन लाथा माराव्या आणि त्याचें तोंड इकडचें तिकडे करून टाकावें; पण बळेंबळेंच आत्मसंयमन करून तो उठून उभा राहिला आणि म्हणाला, " चल, नीघ माझ्यासमोरून. "

पीतांबरला देखील चीड आली होती. तो म्हणाला, " उगीच चिडतां कशाला दादा ? नाहीं गेलों इथून, तर काय बखोटीला धरून बाहेर काढणार आहांत मला ? "

दरवाजाकडे बोट दाखवून नीलांबर म्हणाला, " एवढा मोठा झाला आहेस, माझ्या हातचा मार खाऊन आतां मरायचं नसेल, तर दूर हो माझ्या नजरेसमोरून ! "

तरीही पीतांबर कांहींतरी बोलायला सुरवात करणार होता. त्याला थांबवून नीलांबर म्हणाला, " बस्स ! आतां एक शब्दसुद्धां बोलूं नकोस—नीघ इथून. "

मवाली नीलांबरच्या मनगटाचा जोर प्रख्यात होता.

यापुढें तोंडांतून शब्द काढण्याचें धैर्य पीतांबरला झालं नाहीं. तो तसाच बाहेर निघून गेला.

ही सारी गडबड ऐकून विराज धांवत बाहेर आली आणि नवऱ्याचा हात धरून त्याला ओढून तिनें घरांत नेलें. ती म्हणाली, " [illegible] करून

सवरून भावाबरोबर का अशी हाताहाती करायची ? ”

नीलांबर बेफामपणें म्हणाला, “ माहीत आहे म्हणून काय भीतीनं गठडी वळवून घेऊन बसूं ? हें पहा विराज, मी सारं सहन करीन—पण लफंगेगिरी सहन होत नाहीं मला. ”

विराज म्हणाली, “ तुम्ही कांहीं एकांडे फकीर नाहीं. आज हात धरून घराबाहेर काढलं तर उद्यां आसऱ्याला कुठं जाल याचा कांहीं विचार केला आहे का ? कांहीं आंच आहे का या गोष्टीची ? ”

नीलांबर म्हणाला, “ नाहीं. ज्याला आंच धरायची असेल त्यानं धरावी. उगीच डोकं पिकवून रडत कशाला बसूं ? ”

विराजनें उत्तर दिलें, “ तें खरं आहे. मृदंग बडवीत बसणं हेंच ज्याचं सारं महाभारत, त्याला बऱ्यावाईटाची कसली काळजी ? ”

हे उद्गार विराजनें कांहीं मोठ्याशा मिठास वाणीनें काढले नव्हते. नीलांबरच्या कानांत सुद्धां त्यानीं कांहीं मधुवर्षण केलं नाहीं. तरीही तो अगदीं सहजपणें म्हणाला, “ माझ्या दृष्टीनं तेंच सर्वस्व आहे. शिवाय असं पहा, विचार करीत बसल्यानं का ललाटींचा लेख पुसला जाणार आहे ?—” असें म्हणून कपाळाला हात लावून तो म्हणाला, “ नीट पाहून घे विराज, इथं लिहिलं होतं म्हणून राजेमहाराजांना सुद्धां वनवास पतकरावा लागला. त्यांच्यापुढं मी तर कस्पट ! ”

विराज आंतल्या आंत पिचत होती खरी, तरीही म्हणाली, “ हें असं कांहीं तोंडानं बोलणं जितकं सोपं आहे तितकं प्रत्यक्ष अनुभवणं सोपं नाहीं. शिवाय असं पहा, वनवास पत्करायची तुमचीं तयारी असेल, माझी नाहीं. बायकांच्या जातीला लाज शरम म्हणून कांहीं असते. खुशामत करून म्हणा, सेवाचाकरी करून म्हणा, कुठं तरी चार भिंतींच्या आंत राहणं मला भाग आहे. धाकट्या भावाशीं मिळतं घेऊन राहणं क्षेपत नसेल, तर निदान हाताहाती करून चारी बाजूंनीं मोडता तरी घालून घेऊं नका. ” असें म्हणून डोळ्यांतून येणारें पाणी आवरीत ती झट्कन् तिथून निघून गेली.

या पूर्वीं नवराबायकोच्या मध्यें पुष्कळदां पुष्कळ झगडे झाले होते. नीलांबरला त्याची जाणीव होती. पण आज हें जें कांहीं झालें, तो झगडा नव्हता. हा प्रकार यापूर्वी कधींच घडला नव्हता. हा अवतार अगदींच अपरिचित होता.

तो स्तंभित होऊन उभा राहिला.

थोड्या वेळानें विराज पुनः तिथें आली आणि म्हणाली, " असे सुन्न पडून उभे कशाला राहिलांत ? उशीर झाला आहे. जा, स्नानसंध्या करून आतां चार घांस खा. आहेत चार दिवस ते एकदां पदरांत पाडून घ्या. " असें म्हणून नवऱ्याच्या हृदयावर पुनः एकवार बाण मारून ती निघून गेली.

या खोलींतल्या भिंतीला राधाकृष्णाचें एक चित्र टांगलेलें होतें त्याच्याकडे त्याची नजर गेली. पहातां पहातां नीलांबरला एकदम रडें कोसळलें. तशा स्थितींत आपल्याला कुणी पाहील या भीतीनें चट्कन् डोळे पुसून तो बाहेर पडला.

आणि विराज ?

त्या दिवशीं सारा दिवस जेव्हां तेव्हां तिच्या डोळ्यांतून सारखीं आंसवें गळत होतीं. ज्याला एवढा सुद्धां त्रास झाला तर तिच्या जीवाला लागत असे, त्याला आपण असें टाकून बोललों, या जाणीवेनें तिला अत्यंत पश्चात्ताप झाला होता. साऱ्या दिवसांत तिनें पाण्याला सुद्धां हात लावला नाहीं. सारखी रडत या खोलींतून त्या खोलींत ती फेऱ्या मारीत होती. संध्याकाळीं तुळशी-वृन्दावनाजवळ दिवा लावायला गेल्यावेळीं पदर पसरून प्रणाम करतांना तिला एकदम रडें कोसळलें.

घरांत कुणी चिटपाखरुंसुद्धां नव्हतें. जिकडे तिकडे सामसूम होतें. नीलांबर घरीं नव्हता. दुपारच्या वेळीं ताटासमोर बसून उगीच भात चिवडून तो जो निघून गेला तो अजून परत आला नव्हता.

विराजला वाटलें, काय करावें ? कुठें जावें ? कुणापाशीं जाऊन काय सांगावें ? कुठेंच कसलाही आधार दिसत नाहीं असें पाहून ती हताश झाली. पडवींत, काळोखांत अंग टाकून देऊन ती फुलूनफुलून रडूं लागली.

ती आपल्याशींच म्हणत होती, " हृदयींच्या परमेश्वरा, एकदां नजर टाकून इकडे पहा. ज्या माणसाच्या हातनं आजवर कसलाच दोष घडला नाहीं, पापाची ज्याला कल्पना सुद्धां नाहीं, त्याचा असा छळ करूं नकोस. देवा, आतां यापुढं हें सहन होत नाहीं मला ! "

रात्रीं नवाच्या सुमाराला नीलांबर आला आणि एक शब्दसुद्धां न बोलतां आपल्या बिछानावर आडवा झाला. विराज येऊन येऊन त्याच्या पायतळीं बसली.

नीलांबरनें तिच्याकडे पाहिलेंसुद्धां नाहीं कीं भाषण केलें नाहीं.

थोड्या वेळानं विराजनं नवऱ्याच्या पायावर सहज आपला हात ठेवला. त्या सरशीं त्यानें आपला पाय एकदम मागें घेतला.

आणखीही चार पांच मिनिटें अशीं मुकाट्यानें गेली. दाबलेला राग पुनः जोर करीत होता तरीही तो आवरून विराज हळूच म्हणाली, " जेवायला यायचं ना ? "

नीलांबर उगीच राहिला.

विराज म्हणाली, " सारा दिवस पोटांत अन्न नाहीं. कुणाच्या रागानं हें असं चालवलंय ? सांगा ना ? "

यावरही नीलांबरनें कांहीं उत्तर दिलें नाहीं.

विराज म्हणाली, " सांगा ना काय तें ! "

उदासपणें नीलांबर म्हणाला, " ऐकण्यांत काय हंशील ? "

नीलांबर एकदम उठून बसला. दोन्ही डोळ्यांतून तीक्ष्ण कटाक्ष फेंकीत विराजच्या डोळ्याला डोळा देऊन म्हणाला, " मी तुझा नवरा आहे विराज, खेळणं नव्हे. "

त्याच्या डोळ्यांतली चमक, बोलण्याचा आवाज, ऐकून विराज दचकली. घाबरून सुन्न झाली. असा केविलवाणा, असा गंभीर कंठस्वर तिनें यापूर्वी केव्हांच ऐकला नव्हता.

## ७

मोग्राच्या बाजारांत पितळेच्या सामनाचा एक कारखाना होता. या वाड्यांतल्या अतिशूद्रांच्या बायका मातीचे सांचे तयार करून तिथें नेऊन विकीत असत. असह्य दुःखाच्या जाचणीनं विराजनं त्यांच्यांतल्या एका बाईला गांठून सांचे तयार करण्याची कला शिकून घेतली. तिची बुद्धी तीक्ष्ण होती. हातकामांत ती निष्णात होती. दोनच दिवसांत ही कला अवगत करून घेऊन त्यांच्यापेक्षांही उत्कृष्ट वस्तू ती तयार करूं लागली. व्यापारी लोक येऊन रोख पैसे देऊन त्या जिनसा विकत घेऊं लागले.

याप्रमाणें रोज ती आठ ते दहा आणे कमाई करीत असे. तरीही तिनें ही गोष्ट आपल्या नवऱ्यांजवळ उघड करून सांगितली नाहीं. तो झोंपी

गेला म्हणजे मुकाट्यानें बिछान्यावरून उठून भर रात्रीं ती या कामाला लागत असे.

नित्याप्रमाणें आज रात्रींही ती हें काम करीत होती. काम करतां करतां थकून ती केव्हां तिथेंच लवंडून झोंपी गेली तें तिचें तिलाच कळलें नाहीं.

नीलांबर मधेंच जागा झाला आणि ती बिछान्यावर नाहीं असें पाहून बाहेर येऊन उभा राहिला. विराजचे हात चिखलानें माखले होते, आजूबाजूला तयार तयार झालेले सांचे पडले होते आणि त्याच्याच एका बाजूला त्या तसल्या कडक थंडींत ओल्या मातीवर पडून ती झोंपी गेली होती.

आज तीन दिवस नवरा बायकोची बोलाचाली बंद होती. तिला त्या स्थितींत पाहतांच त्याचे डोळे भरून आले. गरम आसवें ठिबकूं लागलीं. तो एकदम खालीं बसला आणि जमिनीवरचें विराजचें मस्तक हळूच उचलून त्यानें आपल्या मांडीवर घेतलें. विराजला तें कळलें नाहीं. फक्त एकदां इकडे तिकडे हालचाल करून दोन्ही गुडघे उराशीं घेऊन ती सावचेत झोंपी गेली.

डाव्या हातानें आपले डोळे पुसून दुसऱ्या हातानें दिव्यांतली वात सारीत नीलांबरनें टक लावून आपल्या पत्नीच्या तोंडाकडे पाहिलें. तो सारखा पहात राहिला होता. काय झालें होतें हें ? इतके दिवस पहात असतांही कसें आपल्याला दिसलें नाहीं ? विराजच्या डोळ्यांसभोंवार काजळी दाटली होती. भुवयांवरच्या सुंदर आणि प्रशस्त अशा भालप्रदेशावर काळजीच्या रेषा स्पष्ट उमटल्या होत्या.

त्याच्या हृदयाला बाण बसला. अंतःकरणांत कसली तरी अजाण वेदना उत्पन्न झाली. सारें अंतःकरण पिळवटून निघूं लागलें. अगदीं न कळत आसवांचा एक थेंब विराजच्या झांकल्या डोळ्यावर टप् करून पडतांच तिनें डोळे उघडून पाहिलें.

क्षणभर मुकाट्यानें ती तशीच पहात राहिली होती. दोन्ही हात पसरून तिनें नवऱ्याच्या वक्षस्थलाला मिठी मारली आणि त्याच्या कुशींत तोंड खुपसून पाठ फिरवून ती झोंपी गेली.

नीलांबर तसाच बसून राहिला होता. त्याला रडूं कोसळत होतें. आणखी बराच वेळ गेला—पण कोण कांहींच बोललें नाहीं.

रात्र संपत आली, पूर्वेकडे दिशा उजळूं लागल्या, त्यावेळीं नीलांबर भानावर

आला आणि पत्नीच्या मस्तकावर ममताळूपणें हात फिरवीत म्हणाला, " थंडी वाढूं लागली आहे विराज, घरांत चल."

" चला." म्हणून विराज उठली आणि नवऱ्याचा हात धरून आंत खोलींत येऊन झोंपी गेली.

सकाळींच उठल्यावर नीलांबर म्हणाला, " असं पहा विराज, चार दिवस तुझ्या मामाच्या घरीं जाऊन हवापालट करून ये. मीही एकदां कलकत्त्याला जाऊन येतों. "

" कलकत्त्याला जायचं कशाला ? "

नीलांबर म्हणाला, " चार पैसे मिळवायचे अनेक मार्ग तिथं आहेत. कांहीं तरी एकादा आधार कुठं तरी सांपडेल. माझं एवढं ऐकच विराज. कांहीं महिने तिकडे जाऊन ये."

विराजनें विचारलें, " केव्हां मला परत आणाल ? "

" सहा महिन्यांनीं तुला घेऊन येईन. अगदीं वचन देतो हें. "

" बरं आहे." असें विराजनें कबुली दिली.

चार पांच दिवसांनीं बैलगाडी दारीं आली. मामाच्या घरीं जायला आठ दहा कोसांचा प्रवास याच वाहनानें केला पाहिजे होता. गाडी आली खरी पण विराज प्रवासाला निघण्याचें लक्षण कांहीं दिसून आलें नाहीं.

नीलांबर अस्वस्थ होऊं लागला. घाई करूं लागला.

विराज काम करतां करतां म्हणाली, " आज तरी मी कांहीं जात नाहीं. मला बरं वाटत नाहीं."

नीलांबर चकित होऊन म्हणाला, " बरं वाटत नाहीं म्हणजे काय ! "

विराज म्हणाली, " हो, बरं वाटत नाहीं ! फार बिघडली आहे प्रकृति." असें म्हणून तोंड वेंगाडून पितळेची कळशी कडेवर घेऊन पाणी आणण्यासाठीं ती नदीवर गेली.

त्या दिवशीं गाडी परत गेली. त्या रात्रीं बरीच चर्चा झाली. समजूत घाल-ण्याचा बराच प्रयत्न केल्यावर ती दोन दिवसांनीं जायला तयार झाली.

दोन दिवसांनीं पुनः गाडी आली.

गाडी आल्याची वर्दी नीलांबरनें दिली त्यावेळीं विराज एकदम अडून बसली. म्हणाली, " नाहीं, मी केव्हांच जाणार नाहीं ! "

नीलांबर आणखी आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " कां जाणार नाहीं ? "

विराजनें रडायला सुरवात केली. ती म्हणाली, "मी जायची नाहीं. दागिने कुठं आहेत? चार धड साड्या तरी आहेत का? अशी दीन दुबळ्याची कळा घेऊन मी मुळींच जायची नाहीं."

रागाला येऊन नीलांबर म्हणाला, "आज तुझे दागिने नाहींत हें खरं. पण जेव्हां होते तेव्हां कुठं दागिने घालून मिरवत होतीस?"

तशीच कांहीं न बोलतां पदरानें डोळे पुशीत विराज स्वस्थ राहिली.

नीलांबर पुनः म्हणाला, "तुझं ढोंग मला कळलं. मला हें पूर्वीं वाटलंच होतं—तरीपण म्हटलं, हालअपेष्टा भोगून तुझे डोळे उघडले असतील—पण अजून कांहीं तूं ताळ्यावर येत नाहींस. ठीक आहे—आतां तूंही अशीच तडफडत मर अन् मीही मरतों!—" असें म्हणून बाहेर जाऊन त्यानें गाडी घालवून दिली.

दुपारीं नीलांबर आपल्या खोलींत झोंपला होता. पीतांबरही कुठें कामाला गेला होता, अशी संधि साधून धाकट्या सूनबाईनें भिंतीच्या फटींतून हळूच हांक मारली. ती म्हणाली, "जाऊबाई, माझं बोलणं मनावर घेऊं नका—तुम्हाला मी काय समजवायचं?—पण दोन दिवस कां जाऊन आला नाहीं.

विराज कांहींच बोलली नाहीं.

मोहिनी म्हणाली, "त्यांना असं अडचणींत पाडूं नका जाऊबाई. संकटाच्या काळांत एकदां मन घट्ट केलं पाहिजे. उद्यां देवाची कृपादृष्टि पुनः इकडे वळेल."

विराज हळूच म्हणाली, "मी दगडासारखं मन घट्ट करून बसलें आहे मोहिनी."

बराच धीर करून मोहिनी जरा जोरानें म्हणाली, "तर मग आतां जाच जाऊबाई. पुरुष माणसासारखं कांहीं कामकाज करूं द्या त्यांना! मी म्हणतें, आज उद्यां खात्रीनं देवाची दया झाल्यावांचून रहायची नाहीं."

कांहीं तरी उत्तर देण्याच्या उद्देशानें विराजनें वर पाहिलें. पण पुनः मान खालीं घालून ती मुकाट्यानें उभी राहिली.

मोहिनी म्हणाली, "मग नाहींच का जायचं?"

आतां मात्र विराज म्हणाली, "नाहीं—झोंपेतून जाग येतांच त्यांचा चेहरा समोर दिसला नाहीं तर एक दिवस सुद्धां माझ्यानं राहावायचं नाहीं. जें

व्हायचं नाहीं माझ्याकडून तें मला करायला सांगू नकोस मोहिनी—" असें म्हणून ती जायला निघत होती तोंच मोहिनी एकाएकीं रडकुंडीला येऊन तिला हाक मारुन म्हणाली, "थांबा जाऊबाई. जाऊं नका. चार दिवस इथून दुसरी-कडे गेलंच पाहिजे तुम्हाला. नाहीं गेलांत तर मी मुळींच ऐकायची नाहीं."

विराज थांबून उभी राहिली. एक क्षणभर स्तब्ध राहून म्हणाली, "अस्सं! कळलं! सुंद्री आली होती वाटतं?",

मानेनें होकार देत मोहिनी म्हणाली, "हो, आली होती."

"म्हणून मला जायला सांगते आहेस?"

"हो. म्हणूनच सांगतें आहें जाऊबाई. तुम्हीं जाच आतां या गांवांतून."

विराज पुनः क्षणभर स्तब्ध राहिली आणि म्हणाली, "त्या कुतरड्याच्या भीतीनं काय मी माझं घरदार सोडून जाऊं?"

मोहिनी म्हणाली, "कुत्रं पिसाळलेलं असलं म्हणजे त्याला भ्यावंच लागतं जाऊबाई. शिवाय असं पहा, तुमच्या एकटयासाठींच नव्हे—जरा विचार करून पहा —या प्रकरणांतून आणखी काय काय प्रसंग उत्पन्न होतील याचा विचार करा."

विराज पुनः कांहीं वेळ विचार करीत स्वस्थ राहिली. त्यानंतर बेडरपणानं वर पाहून म्हणाली, "नाहीं. कांहीं झालं तरी मी जायची नाहीं!—" असें म्हणून मोहिनीला प्रत्युत्तर द्यायची संधी न देतां ती झट्कन् तिथून निघून गेली.

तरीही तिच्या मनांत भीति उत्पन्न झाली होती. नदींत पुरेसें पाणी नव्हतें. तरीही एक स्नानाचा घाट आणि एक मासे धरायचा माच बांधला जात होता. हें सारें कां चाललें होतें याची विराजला कल्पना आली होती.

एके दिवशीं स्नान करून आल्यावेळीं नीलांबरनें विचारलें, "तिकडे नदी-पलीकडे ते घाट कुणी बांधले आहेत विराज?"

विराज एकदम रागाला आली आणि म्हणाली, "मला काय माहीत?" तेवढेंच बोलून ती रागारागानें तिथून निघून गेली.

तिचा तो आवेश पाहून नीलांबर थक्क होऊन गेला.

त्या दिवसापासून उठल्यासुटल्या वाटेल तेव्हां जाऊन नदीवरून पाणी आणण्याचें विराजनें बंद केलें. एक अगदीं भल्या पहांटे तरी, नाहींतर एक

चांगला काळोख पडल्यावर, ती नदीवर जात असे. हजार अडचणी उत्पन्न झाल्या तरी त्याशिवाय ती दुसऱ्या कोणत्याही वेळीं त्या बाजूला वळत नसे.

मनांतल्या मनांत ती जळतपिचत होती. तिला किळस आला होता. लाज शरमेबरोबरच संतापानें तिचा जीव व्याकुळ होऊन गेला होता. कुणालाही न सांगण्याजोग्या या हलकटपणाबद्दल आणि अत्याचाराबद्दल नवऱ्याकडे तोंड उघडून बोलायचा तिला धीर झाला नाहीं.

तीन चार दिवसांनीं नीलांबर एके दिवशीं घाटावरून आल्यावेळीं हंसून म्हणाला, " नव्या जमीदाराचा थाटमाट पाहिलास विराज ? "

त्याचा प्रश्न कळला तरीही न ऐकलेंसें करून ती म्हणाली, " पाहिला तर काय ! "

पुनः हंसत हंसत नीलांबर म्हणाला, " मला असा प्रश्न पडला आहे, कीं हा माणूस पागल तर नव्हे ? या नदींत चार दोन बोटाएवढे मासे राहण्याइतकं सुद्धां पाणी नाहीं आणि हा माणूस सकाळपासून सारा दिवस ही एवढी मोठी चक्राची गरी धरून राहिलेला असतो ! "

विराज कांहीं बोलली नाहीं, नवऱ्याच्या हंसण्याला जोर देण्याजोगी तिची मनःस्थिति नव्हती.

नीलांबर बोलत होता, "—एकंदरींत हें कांहीं बरं नव्हे. सभ्य माणसाच्या खिडकीच्या घाटासमोर सारा दिवस बसून राहिलं तर बायकापोरं तिथून जातील कशीं ? खरंच, तुला मोठी अडचण होत असेल नाहीं ? "

विराज म्हणाली, झाली तरी करायचं काय ? "

नीलांबर जरा चवताळून म्हणाला, " करायचं काय म्हणजे काय ? गरी घेऊन असा हा पागलपणा करायला दुसरी जागाच नव्हती का याला ? तें कांहीं नाहीं. उद्यां सकाळीं मी त्याच्या कचेरींत जाऊन स्वच्छ सांगून येणार, नाद असला तर म्हणावं दुसऱ्या कुठं तरी जाऊन गरी घेऊन मासे मारीत बसा, आमच्या घराच्या समोर असं कांहीं चालायचं नाहीं. "

नवऱ्याचें भाषण ऐकून विराज घाबरली आणि अस्वस्थ होऊन म्हणाली, " छेः छेः ! उगीच असलं कांहीं तरी बोलायला जाऊं नका तिकडे. कुणालाही नको म्हणायला नदीवर कांहीं आमची एकट्याचीच सत्ता नाहीं ! "

नीलांबर आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " काय म्हणतेस हें विराज,

नदी नसेल आपली; पण माणसाला कांहीं बऱ्यावाईटाचा विवेक असला पाहिजे ना ? उद्यां जाऊन मी एकदां तोंडसुख घेऊन येणार. नाहीं ऐकलं तर स्वतः हे घाट-पाट माचे-बिचे सारे मोडून तोडून फेकून देणार. मग त्याला काय करायचं असेल तें करूं द्या. ''

त्याचें भाषण ऐकून विराज स्तंभित होऊन गेली. त्यानंतर ती हळूच म्हणाली, '' जमीदाराबरोबर झगडा करायला कां जाणार आहांत तुम्ही ? ''

नीलांबर म्हणाला, '' कां जाऊं नये ? मोठा माणूस झाला म्हणजे त्यानं काय वाटेल ते अत्याचार करावे ? आणि आम्ही मात्र ते काय मुकाट्यानं सहन करावे ? ''

'' त्यानं अत्याचार केले असं शाबित करतां येईल का तुम्हाला ? ''

नीलांबर चिडून म्हणाला, '' असला बुद्धिवाद नको आहे मला. मला स्पष्ट दिसतं आहे—ही वर्तणूक गैर आहे. अन् तूं विचारतेस शाबित करतां येईल का म्हणून ! तें काय तें माझं मी पाहून घेईन. ''

एक क्षणभर नवऱ्याच्या चेहऱ्याकडे रोंखून पहात राहून विराज म्हणाली, '' हें पहा, डोकं जरा थंड ठेवा, दोन वेळां ज्याच्या ताटांत अन्न पडत नाहीं त्यांच्या तोंडून असली भाषा ऐकली तर लोकं थुंकतील तोंडावर. ''

'' काय म्हणून ? ''

'' काय म्हणून म्हणे ! जमींदाराच्या मुलाबरोबर दोन हात करायची ताकद आहे का तुमची ? ''

विराजचं भाषण इतक्या कठोरपणानं बोललं गेलं होतं, कीं तें ऐकून नीलांबर एकदम भडकून उठला. मोठ्यानें ओरडून तो म्हणाला, '' जेव्हां तेव्हां प्रत्येक बाबतींत या अन्नाच्या गोष्टी काढतेस, तो मला काय कुत्रा-मांजर समजतेस तूं ? दोन वेळ अन्न मिळालं नाहीं असं कधीं झालं होतं तुझ्याकडे ? ''

हालअपेष्टा काढीत असल्यामुळें विराजच्या अंगीं पूर्वी असलेलें धैर्य आणि सहनशीलता आतां राहिली नव्हती. तीसुद्धां एकदम भडकून उठली. तिनं एकदम उलट जबाब दिला, '' उगीच कशाला किंचाळतां ? दोन वेळ ताटांत अन्न कसं पडतं आहे तें तुम्हांला माहीत नाहीं—पण मला माहीत आहे—अन् माहीत आहे त्या परमेश्वराला ! पुनः जर असली कांहीं गोष्ट काढाल तर विष खाऊन जीव देईन—'' बोलतांना तिची नजर नीलांबरच्या चेहऱ्याकडे गेली.

त्याचा चेहरा पांढरा फटक पडला होता. त्याची नजर तरळली होती—हताश झाली होती. त्या नजरेच्या माऱ्यानें विराज एकदम खचून गेली. तोंडांतून पुनः शब्द काढायचा तिला धीर झाला नाहीं. ती तशीच तिथून निघून गेली.

ती निघून गेली तरीही नीलांबर तसाच ताठरून त्या जागीं उभा राहिला होता. कांहीं वेळानें एक मोठा सुस्कारा सोडून तो बाहेर आला आणि चंडी-मंडपाच्या एका कोंपऱ्यांत सुन्न होऊन बसून राहिला.

ठेंगण्या जागेंत नकळत वर उठतांना माणसाच्या डोक्याला एकदम मार बसला म्हणजे जसा तो सुन्न होतो—तशीच त्याची स्थिती झाली होती. तिच्या रागाचें कारण त्याला कळलें नाहीं. विराजच्या तोंडचें शेवटचें एकच वाक्य त्याच्या कानांत सारखें झणझणत होतें—हा संसार कसा चालतो आहे !

त्याला तो दिवस आठवला. त्या दिवशीं रात्रीं काळाकुट्ट अंधार पडला असतांना पडवींतल्या जमिनीवर ओल्या मातीजवळ पडलेला विराजचा तो थकलेला चेहरा त्याला आठवला. खरेंच तर ! संसार कसा चालत होता, कसे दिवस जात होते, कशा प्रकारें ती एकटी दुबळी स्त्री संसार चालवीत होती, तें आतां त्याला कळल्यावांचून राहिलें नाहीं. आतांच विराज बोलली त्यावेळीं तिचे कठोर शब्द बाणाच्या तिखट टोकासारखे त्याच्या हृदयाला जाऊन भिडले होते. पण स्वस्थपणें बसून जसजसा तो विचार करूं लागला, तसतशी त्याच्या हृदयाला आलेली ती जखम हळूहळू मिटत येऊं लागली.

रागाचा आवेश निघून गेला. एवढेंच नव्हे, तर त्या रागाचें आदरयुक्त श्रद्धेंत रूपांतर होत असल्याचें त्याला जाणवूं लागलें.

ही त्याची विराज म्हणजे आजकालचीच एक कुणी सामान्य स्त्री का होती ? युगायुगांतरांतून तिचें अस्तित्व जाणवत होतें. तीच ही अनादि कालची विराज ! दोन दिवसांच्या करज्या जबाबावरून तिला दोष देणं उचित झालं नसतं. दयेनं किती भरपूर भरलं होतं तें हृदय ! तें जितकें त्याला जाणवत होतें तितकें दुसऱ्या कुणालाही कळलें नसतें !

आतां त्याच्या डोळ्यांतून दरदरून आंसवें वाहूं लागलीं. दोन्ही हात जोडून त्यानें एकदम वर पाहिलें आणि दाटल्या गळ्यानें तो म्हणाला, " भगवंता, माझं असेल नसेल तें सारं घेऊन जा—पण एवढी हिला मात्र घेऊन जाऊं नकोस !—" बोलतां बोलतां त्याच्या हृदयांतला आवेग अनावर झाला आणि

त्याच क्षणाला धांवत जाऊन आपल्या प्रियतमेला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरावें असें त्याला वाटलें.

तो धांवतच आंत गेला आणि विराजच्या खोलीच्या बंद केलेल्या दारासमोर उभा राहिला. दाराला आंतून कडी लावलेली होती. त्यानें दारावर थाप मारली आणि सद्गदित आवाजानें हांक मारली—" विराज. "

जमीनीवर अंग टाकून विराज रडत पडली होती. ती दचकून उठून बसली.

नीलांबर म्हणाला, " काय करते आहेस विराज ? दार उघड. "

विराज घाबरली. भीत भीत दाराजवळ येऊन मुकाट्यानें उभी राहिली.

उतावीळ होऊन नीलांबर म्हणाला, " दार उघड ना विराज ! "

रडकुंडीला येऊन विराज अगदीं हळूच म्हणाली, " मारणार नाहीं म्हणून कबूल करा आधीं. "

" मारणार ? " तीक्ष्ण धारेच्या सुरीसारखे ते शब्द नीलांबरच्या हृदयांत जाऊन घुसले. त्याला शरम वाटली. व्याकुळ होऊन गेल्यामुळें त्याचा गळा दाटून आला. त्याचें मस्तक सुन्न झालें. दाराच्या चौकटीचा आधार घेऊन तो उभा राहिला होता. विराजला आंतून तें दिसत नव्हतें. सुरी मागून सुरी नकळतां मारीत ती रडत रडत म्हणत होती, " आतां यापुढं मी अशी कधींच बोलायची नाहीं. आधीं सांगा ' नाहीं ' म्हणून. "

नीलांबर कसाबसा तोंडांतल्या तोंडांत पुटपुटला. भीत भीत विराजनें कडी काढली आणि दरवाजा उघडला त्यासरशी नीलांबर तळमळतच आंत आला आणि डोळे झांकून बिछान्यावर आडवा पडला.

त्याच्या झांकलेल्या डोळयाच्या दोन्हीं कोंपऱ्यांतून धो धो करून आसवें वाहत होतीं.

नवऱ्याची अशी स्थिति झालेली विराजनें यापूर्वी कधींच पाहिली नव्हती. आतां तिला सारें कांहीं कळून चुकलें. ती त्याच्या उशाशीं येऊन बसली आणि मोठ्या प्रेमळपणामें त्याचें मस्तक उचलून आपल्या मांडीवर घेऊन पदरानें त्याचे डोळे पुसूं लागली.

बाहेर दाट होत असलेला काळोख हळूहळू आंत पसरत होता. तरीही दोघांपैकीं कुणाचेंही तोंड उघडलें नाहीं. कुणी कांहीं बोललें नाहीं. अंधारांतल्या त्या बिछान्यावर दोघेंही निस्तब्ध होऊन राहिलीं होतीं.

पण नवराबायकोच्या त्या अंतरंगांत जें संभाषण चाललें होतें तें त्यांच्या अंतरींच्या परमेश्वरालाच ऐकूं आलें असावें.



तरीही नीलांबर विचार करीत होता, कीं विराजच्या तोंडून असे उद्गार आले कसे ? आपण तिच्या आंगावर हात टाकीन, मारझोड करीन, इतकी हीन कल्पना आपल्याबद्दल तिच्या मनांत उत्पन्न कां झाली ?

इकडे तर संसारांत हालअपेष्टांना पारावार नव्हता. त्यावर आतां हें रोज काय चाललें होतें ? भांडणाशिवाय दोन दिवससुद्धां जात नव्हते. शब्दाशब्दाला मनोमालिन्य, पहातां पहातां झगडा, पावलोपावलीं मतभेद उत्पन्न होत होते. त्याला सर्वात जास्त वाईट वाटत होतें तें याचेंच, कीं त्याची विराज दिवसें-दिवस अशी ही काय होऊं लागली होती ! या दुःखाच्या समुद्रांत त्याला कुठेंच किनारा दिसेना.

ईश्वराच्या ठायीं नीलांबरची अचल भक्ति होती. अदृष्टाच्या लेखावर त्याचा निस्सीम विश्वास होता. तो याच गोष्टीचा विचार करूं लागला. नुसत्या मनानें-सुद्धां आपण कुणाचा कांहीं अपराध केला नाहीं, कधीं कुणाची निंदा केली नाहीं.

चंडीमंडपाच्या भिंतीला टांगलेल्या राधाकृष्णाच्या चित्रासमोर उभा राहून तो रडत रडत बोलूं लागला, " देवा, अशा या हालअपेष्टांत मला टाकावं असं जर ठरवलं होतंस, तर मला हा इतका दुबळा करून कां ठेवलास ? "

आपण किती दुबळा होतों याची इतर कुणापेक्षांही त्याला जास्त कल्पना होती. लिहिणें वाचणें झालें नाहीं, कसलेंच कामकाज करतां येत नाहीं, येत होतें एकच, दीनदुबळ्यांची सेवा करणें. तो शिकला होता एकच—भगवंताचें भजन करणें. या गोष्टीपायीं दुसऱ्याचें दुःख त्याला दूर करतां येई, पण प्रसंगीं आतां स्वतःचें दुःख कसें दूर करावें हेंच त्याला कळेना.

आतां आपलें म्हणायला त्याला कांहींच राहिलं नव्हतं. सारें कांहीं गेलें होतें या क्लेशांच्या पायीं पुनः पुनः त्याच्या मनांत येई, कीं आतां इथें राहूं नये. विराजला बरोबर घेऊन जिकडे वाट फुटेल तिकडे निघून जावें. पण सात पिढ्यांची ही वाडवडिलांची वास्तु टाकून कुठल्या देवळाच्या दारांत बसून, कुठल्या झाडाच्या सावलींत पडून, सुख मिळणार होतें ?

ही छोटीशी नदी, झाडाझुडुपांनीं घेरलेलं हें छोटंसं घर, या घराच्या आसपास जन्मभर ओळखीचे झालेले माणसांचे चेहरे, हें सारें सोडून कोणत्या देशांत, कोणत्या स्वर्गांत जाऊन एक दिवस तरी जगतां येईल का आपल्याला !

याच घरांत त्याच्या आईनें देह ठेवला होता. याच चंडीमंडपांत मुमूर्षु पित्याची शेवटची सेवा करून तो त्याला गंगेवर पोंचवून आला होता. याच जागीं त्यानें छोटीला लहानाची मोठी केली होती. इथेंच तिचें लग्न लावून दिलें होतें. या घरदाराचे मायापाश कसे तोडायचे ?

तो तिथेंच खालीं बसला आणि दोन्ही हातांनीं तोंड झांकून घेऊन ओठ दाबून रडूं लागला.

आणि त्याचें दुःख एवढ्यावरच कां थांबलें होतें ? लाडक्या बहिणीला कुठें तरी देऊन टाकलें, तिची एवढीसुद्धां खबर मिळेनाशी झाली—इतके दिवस होऊन गेले पण तिचें नुसतें तोंड सुद्धां दिसलें नाहीं, तिच्या तोंडची ' दादा—' म्हणून मारलेली हांक कित्येक दिवसांत कानीं आली नाहीं, दुसऱ्याच्या घरीं तिचे किती हाल होत असतील, किती टिपें गाळावीं लागत असतील,—कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां त्याला कळत नव्हतें.

आणि इकडे तर विराजसमोर तिचें नांव काढायची देखील चोरी होती ! तिनें तिला लहानाची मोठी केली. तरीही ती तिला विसरली. पण आपण हा विसर पाडून कसा घ्यायचा ? आपल्याच आईच्या कुसव्यांतली ती बहीण, कडे खांद्यावर वाढवलेली, जातां येतां बरोबर वागवलेली, तिच्यापायीं लोकांचीं किती बोलणीं, किती टोंचण्या सहन केलेल्या—छोटीला घरीं रडत टाकून घरा-बाहेर एक पाऊल कधीं टाकतां आलें नव्हतें, हें माहीत होतें एक त्याला कीं एक त्याच्या छोट्या बहिणीला.

विराज जाणूनबुजून वेड पांघरीत होती. एक शब्दसुद्धां बोलत नव्हती. छोटीच्या बाबतींत तिचें काळीज अगदीं दगडासारखें झालें होतें. तोंड कायमचें बंद होऊन बसलें होतें, त्या निरपराध पोरीला तिनें असें अपराधी ठरवून दुरावून ठेवलें होतें ही गोष्ट त्याच्या मनाला बाणासारखी भेदून गेली होती. पण या बाबतींत एवढी-सुद्धां चर्चा करायला कुठें मार्ग नव्हता. केव्हां तरी बोलतांना एखादा शब्द काढला तर विराज त्याला थांबवून म्हणे, " आतां त्या गोष्टी नकोत. ती राजाची राणी होऊन राहूं दे. आतां तिच्या बाबतींत कांहीं बोलायचं नाहीं."

हा ' राजाची राणी ' शब्द विराज अशा कांहीं रीतीनें उच्चारीत असे, कीं तो ऐकतांच नीलांबरच्या हृदयांत आग भडकून उठे. उगीच तिला वडिलांचा शाप बाधेल, तिचें अकल्याण होईल, या भीतीनें तो मनांतल्या मनांत

व्याकुळ होऊन जाई. त्यासाठीं रोज देवाजवळ तो काकुळती मागे. तिच्या नांवें वाडी काढून हळूच कुणाला नकळत नदींत सोडून देत असे. अशा रितीनें तो आयुष्याचा काळ कंठीत होता.

नवरात्राचे दिवस आले. दुर्गापूजा जवळ आली. कुणाला नकळत त्यानें एक रुपया कुठून तरी आणला आणि एक कापड आणि थोडी मिठाई घेऊन तो सुंद्रीला गांठायला गेला.

सुंद्रीनें त्याला बसायला आसन दिलें. गुडगुडी भरून आणून हातीं दिली.

नीलांबर तिथें बसला. त्यानें आपल्या फाटक्या मळक्या उपरण्यांतून ते जिन्नस बाहेर काढले आणि म्हटलें, " तुझ्याच अंगावरती ती वाढली आहे सुंद्री. एकदां जाऊन तिला भेटून ये—" पुढें त्याच्या तोंडून शब्द निघेना. तोंड वळवून त्यानें उपरण्यानें आपले डोळे पुसले.

सुंद्रीला त्याच्या हालअपेष्टांची हकीकत माहीत होती. गांवच्या साऱ्या लोकांना ती कळली होती.

सुंद्री म्हणाली, " ती कशी काय आहे बडे बाबू ? "

नीलांबर नुसता उद्गारला, " माहीत नाहीं. "

सुंद्रीला तशी अक्कल होती. तिनें यावर प्रश्न केला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जायचें तिनें कबूल केलें तेव्हां वाटखर्चीसाठीं नीलांबर तिला कांहीं देऊं लागला सुंद्रीनें तें घेतलें नाहीं. ती म्हणाली, " नाहीं बडेबाबू. तुम्ही हें कापड घेऊन आतां चुकलां आहांत, नाहींतर हें सुद्धां मी तुम्हांला घेऊं दिलं नसतं. तुमच्याप्रमाणेंच ती माझ्याही आंगाखांद्यावर वाढली आहे. "

नीलांबरच्या डोळ्यांतून पुनः आंसवें वाहूं लागलीं. तोंड फिरवून तो सारखा डोळे पुसूं लागला सहानुभूतीचा हा उद्गार त्याला यापूर्वीं कुठेंच ऐकूं आला नव्हता. सारेच म्हणत होते—कीं त्याचेंच चुकलें. वेडेपणा झाला. छोटीच्या पायींच त्याचा सर्वनाश झाला !

आपल्या या हालअपेष्टांची हकीकत छोटीच्या कानीं जाऊं न देण्याची खबरदारी घेण्याबद्दल सुंद्रीला बजावून तो जायला निघाला.

नीलांबर निघून गेला तेव्हां सुंद्रीनेंही आपल्या डोळ्यांत आलेलीं दोन आसवें पदरानें पुसून घेतलीं. तसें पाहिलें तर तो सर्वांचाच आवडता होता. सर्वांनाच तो हवासा वाटत होता.

विजयादशमीचा दिवस — त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं विराज आपल्या झोंपायच्या खोलींत गेली आणि आंतून दाराला खीळ घालून बसली. संध्याकाळच्या वेळीं बाहेरून कुणी 'निळूकाका' म्हणून तर कुणी 'निळूदादा' म्हणून हांका मारीत घरांत आले.

नीलांबरचा चेहरा उतरलेला होता. चंडीमंडपाबाहेर येऊन तो कसाबसा त्या लोकांसमोर येऊन उभा राहिला. रीतसर नमस्कार चमत्कार मिठामिठी झाल्यावर ते घरवालीला नमस्कार करण्यासाठीं आंत जायला निघाले. त्यांच्याबरोबर नीलांबरही आंत आला. आंत येऊन पाहातो तों विराज स्वंयपाकघरांत नव्हती. शेजघराचा दरवाजा आंतून बंद होता. दारावर थाप मारून तो म्हणाला, "तुला नमस्कार करायला मुलं आलीं आहेत विराज."

विराजनं आंतूनच उत्तर दिलं, "मला ताप आला आहे. उठवत नाहीं."

मुलं निघून गेलीं. त्यानंतर पुनः दारावर थाप पडली. विराजनं साद दिली नाहीं. दाराच्या बाहेरून नाजुकशी हांक ऐकूं आली, "जाऊबाई, मी मोहिनी— जरा दार उघडा ना!"

तरीही विराज कांही बोलली नाहीं.

मोहिनी म्हणाली, "हें चालायचं नाहीं जाऊबाई. सारी रात्र या दारासमोर धरणं धरून बसावं लागलं तरी बसेन; पण आजच्या दिवशीं तुमचा आशीर्वाद घेतल्याशिवाय इथून हलायची नाहीं."

दार उघडून विराज येऊन तिच्यासमोर उभी राहिली. मोहिनीच्या डाव्या हातीं मिठाईची थाळी आणि उजव्या हातांत प्रसादाचा सिद्धीगोळा असल्याचं तिला दिसून आलं. ते जिन्नस शेजारीं ठेऊन विराजच्या दोन्हीं पायांवर डोकें ठेवून प्रणाम करून मोहिनी म्हणाली, "तुमच्यासारखंच व्हावं, एवढाच आशीर्वाद मला द्या जाऊबाई. यापेक्षां कसलाच आशीर्वाद मला तुमच्या तोंडून नको."

आसवांनीं भरून आलेले डोळे पदरानं पुसून विराजनं कांहीं न बोलतां आपला हात धाकट्या जावेच्या मस्तकावर ठेवला.

मोहिनी उठून उभी राहिली आणि म्हणाली, "आजच्या दिवशीं डोळ्यांतून टीप गाळायचं नसतं. पण तुम्हां वडील माणसांना हें सांगवत नाहीं माझ्याच्यानं. तुमच्या देहावरून जाणारा वारा जरी नुसत्या माझ्या अंगाला लागून जाईल तर तेवढ्याच जोरावर पुढल्या वर्षी काय सांगायचं तें याच दिवशीं सांगेन."

मोहिनी निघून गेल्यावर तिनं ते सारे जिन्नस उचलून आंत ठेवले. ती स्वस्थ बसून राहिली होती. रात्रंदिवस मोहिनी आपल्यावर सारखी नजर ठेवते आहे, ही गोष्ट तिला पुरेपुर कळून चुकली.

त्यानंतर कितीतरी मुलें भेटायला आलीं, येऊन गेलीं तरीही विराजनं दार झांकून घेतलं नाहीं. येणाऱ्या मुलांबाळांना ते जिन्नस देऊन तिनं त्या दिवसाचा आचार साजरा केला.

दुसऱ्या दिवशीं अगदीं थकल्यागत होऊन ती विळीवर वसून भाजी चिरीत होती. सुंद्रीनं येऊन तिला नमस्कार केला. तिला आशीर्वाद देऊन विराजनं बसायला सांगितलं.

सुंद्री वसली आणि म्हणाली, " काल बरीच रात्र झाली म्हणून आलं नाहीं. आतां ही सकाळींच सांगायला आलें. पण तूं कांहीं म्हण सूनबाई, आधीं हें कळतं तर मी गेलेंच नसतं."

विराजला तिच्या उत्तराचा अर्थ कळला नाहीं. ती नुसती पहात राहिली.

सुंद्री बोलत होती, "—घरांत तसं कुणीच नव्हतं. सारे गेले आहेत पश्चिमेला हवा खायला. तिथं होती काय ती एक म्हातारी आत्या. काय ती तिची कडक भाषा सूनबाई! म्हणते काय—घेऊन जा हें परत. जांवयासाठीं एक धोतर सुद्धां पाठवलं नाहीं. नुसता एक सुताडा धाडून देऊन पूजेच्या आहेराचं भागवतात! त्यानंतर मग हलकट, चांभार, डोळ्याला कातडी नाहीं—असं जें जें कांहीं ती बोलली तें न सांगितलेलंच बरं."

विराजनं आश्चर्यचकित होऊन विचारलं, " कोण कुणाला बोललं ग ? "

सुंद्री म्हणाली, " का बरं—आमच्या बाबूंना ! "

विराज अगदीं अस्वस्थ होऊन गेली. तिला कांहींच माहीत नव्हतं—अर्थात तिला कांहींच कळलं नाहीं. ती म्हणाली, " कोण बोललं हें, तें सांग ना—"

तें ऐकून सुंद्रीलाही थोडेंसें आश्चर्य वाटलं. ती म्हणाली, " तेंच तर एवढा वेळ सांगतें आहें सूनबाई. छोटीच्या म्हाताऱ्या आतेसासूचें कर्तूत! काय गर्व! काय दिमाख! नेलेली साडी घेतली नाहीं. परत दिली—" असं म्हणून पदराखालची साडी बाहेर काढून तिनं समोर ठेवली.

आतां विराजला सारा प्रकार कळून चुकला. डोळे फाडून ती त्या साडीकडे पहात राहिली होती. अंतर्बाह्य आगीचा डोंब भडकला होता.

नीलांबर बाहेर गेला होता. केव्हां परत येईल तें निश्चित नव्हतें. त्याची वाट पहात बसायला सुंद्रीला फुरसत नव्हती म्हणून ती निघून गेली.

दुपारीं नीलांबर जेवायला वसला होता. विराजनें ती साडी आणून त्याच्या समोर ठेवली आणि म्हटलें, " सुंद्री परत देऊन गेली."

त्या साडीकडे नजर जातांच नीलांबरचा चेहरा भीतीनें खर्रकन् उतरला. ही भानगड अशा प्रकारें विराजच्या कानीं येईल अशी त्यानें मुळींच अपेक्षा केली नव्हती; म्हणून कोणत्याच प्रकारें कांहीं सुद्धां न विचारतां तो मान खालीं घालून स्वस्थ बसला.

विराज म्हणाली, " त्यांनीं कां घेतली नाहीं, शिव्याशाप देत कां परत केली, वगैरे सारं कांहीं ऐकायचं असेल तर सुंद्रीला जाऊन विचारा."

तरीही नीलांबरनं वर पाहिलं नाहीं कीं तिचें भाषण कानीं आल्याचें दिसूं दिलं नाहीं.

विराजसुद्धां उगीच राहिली.

नीलांबरची भूकतहान एकदम मिटून गेली. तो घावरला होता. तो खालीं मान घालून वसला होता. विराज कठोर नजरेनं आपल्याकडे पहाते आहे, त्या नजरेंतून आगीच्या ठिणग्या फेंकते आहे, अशी जाणीव त्यावेळीं त्याला होत होती.

संध्याकाळीं तो सुंद्रीच्या घरीं गेला आणि सारी हकीकत पुनः पुनः ऐकून घेऊन म्हणाला, " पश्चिमेला हवा खायला गेले आहेत होय ? तर मग खास सारीं माणसं खुशाल आहेत. नाहीं सुंद्री ? "

सुंद्री मान हलवीत म्हणाली, " खुशाल आहेतच म्हणायचीं बाबू."

बळेंच चेहऱ्यावर उजाळा आणून नीलांबर म्हणाला, " केवढी मोठी झाली आहे पाहिलीस ? "

सुंद्री हंसून म्हणाली, " तिची भेट झाली नाहीं बाबू."

तो प्रश्न केल्यामुळें ओशाळून नीलांबर म्हणाला, " हो खरंच ! पण नोकर-चाकरांकडून कांहीं कळलं का ? "

" नाहीं बाबू, तिची ती मेली आतेसासू—तिचा तो बोलण्याचा सपाटा, ते हातवारे आणि तो थयथयाट—त्यापुढं कुठं काय सुचत होतं मला ? तिथून पळायला सुद्धां वाट सांपडेना."

नीलांबर क्षणभर उगीच राहिला. त्याच्या मनांत कालवाकालव सुरू झाल्याचें त्याच्या मुद्रेवरून दिसत होतें.

तो म्हणाला, “ बरं—आमची छोटी आतां वाळली आहे कीं जरा अंगानं भरली आहे—काय झालं असेल असं वाटतं तुला ? ”

त्याच्या प्रश्नाचीं उत्तरें देतां देतां सुंद्री मेटाकुटीला आली होती. ती थोडक्यांत उत्तर देण्यासाठीं म्हणाली, “ आतां भरली असेल ती अंगानं—”

आशाळभूतपणें नीलांबरनं पुनः प्रश्न केला, “ तुला सांगितलं वाटतं कुणी ! होय ? ”

मान हलवून सुंद्री म्हणाली, “ नाहीं बाबू. कांहींसुद्धां सांगितलं नाहीं कुणी.”

“ तर मग कसं कळलं तुला ? ”

आतां मात्र सुंद्री अगदीं टेकीला आली. ती म्हणाली, “ कुठं काय कळलं आहे ? तुम्ही विचारलंत मला काय वाटतं म्हणून. तेव्हां मी आपलं म्हटलं, कीं आतां चांगली अंगानं भरली असेल म्हणून. ”

“ असं होय ? ” नीलांबर मान हलवीत म्हणाला.

किती वेळ तरी तो सुंद्रीच्या चेहऱ्याकडे मुकाट्यानं वेड्यासारखा पहात राहिला होता.

एक मोठा सुस्कारा सोडून तो उठून उभा राहिला आणि म्हणाला, “ आज आतां येतों तर सुंद्री. पुनः केव्हांतरी येईन. ”

सुंद्रीला त्यावेळीं हायसें वाटलें. तिचा तरी काय दोष ? तसें पाहिलें तर बोलायला कांहींच नव्हतें. सारखे दोन घंटे पुनः त्याच त्याच गोष्टी शंभर वेळां उलटूनपालटून सांगितल्या तरी नीलांबरची जिज्ञासा तृप्त करणें तिला शक्य झालें नव्हतें.

ती घाईघाईनें म्हणाली, “ होय बाबू, रात्र फार झाली. आज आतां या. पुनः केव्हां दिवसा उजेडीं आलांत म्हणजे आपण बोलूं साऱ्या गोष्टी. ”

सुंद्रीचा अस्वस्थपणा आतां कुठें नीलांबरच्या ध्यानीं आला. “ बरं तर—येतों. ” असें म्हणून तो चालता झाला.

सुंद्रीच्या या अस्वस्थपणाचें एक विशेष कारण होतें.

याच वेळीं शेजारच्या वाडींतले निताई गांगुली बहुधा दररोज तिची खबर घेण्यासाठीं तिथें पायधूळ झाडीत असत. ही पायधूळ धन्याच्या नजरेला येईल या भीतीनें ती क्षणोक्षणीं घाबरून जात होती. या ना त्या कारणामुळें तिच्या नशिबानें उलट खाल्ली होती. जमींदाराच्या मर्जीमुळें त्या शरमेचें रूपांतर अभिमानांत होऊं लागलें होतें. तरीही या निष्कलंक आणि सच्चरित्र ब्राह्मणाच्या

समक्ष आपली हीनता उघडकीस येण्याच्या भीतीनें, ती शरमेनें चूरमार होऊन जात होती.

नीलांबर निघून गेल्यावर तिचा जीव खालीं पडला. दार बंद करून घेण्यासाठीं ती दाराजवळ आली तों नीलांबर परत येत असल्याचें तिला दिसून आलें. त्याची वाट पहात वांकडें तोंड करून ती दारांतच उभी राहिली. द्वादशीच्या चंद्राचा कोंवळा प्रकाश तिच्या चेहऱ्यावर पडला होता.

नीलांबर जवळ आला आणि जरा इकडे तिकडे चुळबुळ करून त्यानें उपरण्याच्या गांठीची एक अधेली काढून तिच्यासमोर करीत ओशाळेपणानें म्हटलें, " तुला सांगायला लाज कसली सुंद्री ? तुला सारं कांहीं माहीत आहे. घे ही अधेली. एवढी एकच आहे—" असें म्हणून त्यानें हात पुढं केला. जीभ चाऊन सुंद्री एकदम मागें हटून उभी राहिली.

नीलांबर म्हणाला, " फार तसदी दिली तुला. जायचा यायचा खर्चसुद्धां देतां आला नाहीं ! पुढं त्याच्या तोंडून शब्द निघाले नाहींत. रडण्याचा हुंदका येऊन त्याचा गळा भरून आला.

एक क्षणभरच सुंद्री विचार करीत थांबली. दुसऱ्याच क्षणाला हात पुढं करून म्हणाली, " कांहीं झालं तरी पहिल्यापासून तुम्ही आमचे धनी. नाहीं म्हटलेलं चालायचं नाहीं मला—" असें म्हणून अधेली हातीं घेऊन तिनें मस्तकाला लावली आणि ती पदराच्या गांठीला बांधीत बांधीत म्हणाली, " तसेच जरा आंत या पाहूं—"

ती आंत गेली. नीलांबर तिच्या पाठोपाठ येऊन माजघरांत उभा राहिला. सुंद्री आपल्या खोलींत गेली.

कांहीं वेळानें ती बाहेर आली आणि नीलांबरच्या पायांजवळ एक मूठ रुपये ठेवून तिनें त्याला साष्टांग नमस्कार घातला आणि त्याच्या पायाची धूळ मस्तकाला लावून घेऊन ती उठून उभी राहिली.

आश्चर्याच्या धक्क्यानें नीलांबर हतबुद्ध होऊन नुसता पहात राहिला.

उगीच थोडेसें हंसून सुंद्री म्हणाली, " नुसतं बघत राहून चालायचं नाहीं बाबू ! किती झालं तरी आम्ही वडिलार्जित नोकर. शुद्र आहोंत म्हणूनच ही एवढी ताकद आहे आमच्या अंगीं !—" असें म्हणून खालीं वांकून तिनें ते रुपये उचलले आणि त्याच्या उपरण्याच्या गांठीला बांधीत ती गहिंवरून म्हणाली, " हा तुमच्याच घरचा पैसा आहे बाबू. तीर्थयात्रेला जायचं म्हणून

देवाच्या नांवें बाजूला काढून ठेवला होता. यात्रेला जावं लागलं नाहीं. देवच घरीं आला आणि आतां देवाला देऊन टाकतें आहें—"

त्यावेळीं देखील नीलांबरच्या तोंडून शब्द बाहेर फुटेना.

उपरण्याच्या पदराला चांगली घट्ट गांठ बांधून देऊन सुंद्री म्हणाली, "सुनबाई घरीं एकटी आहे. आतां जा लौकर. पण ही गोष्ट मात्र तिला कांहीं केल्या कळूं देऊं नका."

नीलांबर कांहीं तरी उत्तर देणार होता पण त्याला थांबवून सुंद्री म्हणाली, "हजार गोष्टी सांगितल्यात तरी मी ऐकून घेणार नाहीं बाबू. आज माझा मान राखला नाहींत तर इथं डोकं फोडून घेऊन जीव देईन —"

त्याच्या उपरण्याचा पदर त्यावेळीं तसाच तिच्या हातीं होता इतक्यांत—"काय चाललंय ग ऽ ?" असें म्हणत निताई गांगुली उघड्या दरवाजांतून आंत येऊन माजघरांत उभा राहिला.

उपरण्याचा पदर सोडून सुंद्री बाजूला झाली. नीलांबर तसाच बाहेर निघून गेला.

कांहीं वेळपर्यंत निताई दचकल्यासारखा होऊन पहात राहिला होता. नंतर तो म्हणाला, "गेला हा निळूच ना ?"

सुंद्रीला मनांतल्या मनांत संताप आला. तरी ती शांतपणें म्हणाली, "हो माझे धनी."

"म्हणे अन्नाला मोताद झालाय्—एवढ्या रात्रीं इथं कुठं ?"

"काम होतं म्हणून आले होते."

"ऊंः ! काम होतं होय ?" असें म्हणून निताई गालांतल्या गालांत थोडासा हंसला. उद्देश एवढाच, कीं आपल्यासारख्या जाणक माणसाच्या डोळयांत धूळ फेंकणें कांहीं सोपें काम नव्हे हें तिला कळावें.

या हंसण्याचा अर्थ सुंद्रीलासुद्धां स्पष्टपणें कळून आला. निताईचें वय पन्नाशी-पलिकडे गेलं होतें. डोक्यावरच्या केसांतले बारा आणे केंस पिकले होते. दाढीमिशीला चाट दिलेला, डोक्याला शेंडी, कपाळावर सकाळच्या चंदनाचा टिळा अजूनही झळकतो आहे—सुंद्री त्याच्याकडे सारखी निरखून पहात होती. ती अशी कां पहात होती त्याची कल्पना निताईला येणें शक्य नव्हतें. म्हणून तो थोडासा उत्तेजित होऊन म्हणाला, "अशी पहाते आहेसशी ?"

" पहातें आहें ! "

" काय पहाते आहेस ? "

" पहातें आहे, तुम्हीही बामण आणि आतां निघून गेले तेही बामण. पण दोघांत जमीनअस्मानाचं अंतर. "

त्या उद्गारांचा अर्थ नीटसा न कळल्यामुळें निताईनें विचारलें," अंतर कसलं?"

थोडेसें हंसून सुंद्री म्हणाली, " म्हातारें माणूस—थंडींत उभे राहूं नका. या आतां इकडे—बसा—खरंच सांगतें गांगुली महाशय—तुमच्याकडे पाहिलं अन् वाटलं—माझ्या धन्याच्या पायींची एक चिमूटभर धूळ मिळाली तर तुमच्या-सारख्या कित्येक गांगुलींचा कित्येक जन्मांवरी उद्धार होऊन जाईल ! "

तिचें भाषण ऐकून निताईला जेवढं आश्चर्य वाटलें तितकाच तो संतापानें गैरभैर झाला. एक गुडगुडी घेऊन तंबाकू भरीत भरीत अगदीं सहजपणें सुंद्री बोलत होती, " रागाऊं नका ठाकूर. खरं तें बोललें—आजचीच गोष्ट नव्हे—केव्हांपासून पहात आलें आहें—धन्यांच्या गळ्यांतलं जानवं पाहिलं कीं डोळे जसे कांहीं दिपून जातात. असं वाटतं—गळ्याभोंवतीं जशी काय आकाशींची बिजली नाचते खेळते आहे. तेंच तुमच्याकडे पाहिलं—पाहिलं कीं मला हसूं येतं—" असें म्हणून खी खी करून ती हंसत सुटली.

पहिल्यापासूनच निताई मत्सरानें जळत होता. आतां संतापानें बेफाम होऊन गेला. डोळयांवाटे आगीच्या ठिणग्या फेंकीत तो ओरडून म्हणाला, " एवढा दिमाख दाखवूं नकोस सुंद्री. थोबाड सडून जाईल "

चिलमीवर फुंकर देत देत त्याच्याजवळ येऊन सुंद्री हंसत हंसत म्हणाली. " कांहींसुद्धां व्हायचं नाहीं. घ्या—गुडगुडी ओढा. उद्यां मेलांत तर हें तुमचं तोंड सरणांतली आगसुद्धां घ्यायचं नाहीं. माझ्या गरीब बिचाऱ्या धन्याला पाहून हंसणारं हें तोंड—"

गुडगुडीचा एक दम मारून ती बाजूला फेंकून देऊन तो उभा राहिला. त्याच्या उपरण्याचं एक टोंक धरून ओढीत सुंद्री हंसत हंसत म्हणाली, " बसा—पुरे झालं. बसा—शपथ आहे माझी—"

संतापलेला निताई तिच्या हातून उपरणं ओढून घेऊन, " जा नरकांत ! जा जहान्नममधें—सत्यानाश झाला तुझा तो—! "—असे शाप देत देत तणतणत तिथून निघून गेला.

सुंद्री तिथंच बसली. बसल्या बसल्या तिनं पोटभर हंसून घेतलं. नंतर उठून तिनं सदर दरवाजा बंद केला. ती स्वतःशींच पुटपुटत होती—" हे बघा आणि हे बघा ! बामण म्हणजे तोच. एवढ्या हालअपेष्टा चालल्या आहेत पण सारखा हंसतमुख. वर डोळे करून बघणंसुद्धां मोठं कठीण. आग येतं आहे जणूं डोळ्यावाटे ! "

# ९

कुणाच्या उपद्व्यापामुळें ही बातमी पसरली तें सांगतां आलं नसतं; पण विपर्यास होऊन ती गोष्ट विराजच्या कानापर्यंत जाऊन पोंचल्यावांचून राहिली नाहीं. त्या दिवशीं चर्चा करायला आल्या होत्या शेजारच्या आत्याबाई. तिचं बोलणं विराजनं अगदीं मन लावून ऐकून घेतलं आणि अगदीं गंभीर-पणानें म्हटलें, " तुमचा एक कानच कापून ध्यायची लायखी आहे तुमची आत्याबाई. "

आत्याबाई रागावली आणि निघून गेली. जातांना ती म्हणत होती—" केव्हांची ओळखतें आहें मी हिला. असली फाजील बायको गावांत दुसरी आहे का कुणी ? "

नवऱ्याला हांक मारून बोलावून विराज म्हणाली, " केव्हां गेलां होतां पुनः त्या सुंद्रीच्याकडे ? "

नीलांबर घाबरून शुष्क झाला. त्यानं उत्तर दिलं, " छोटीची खबर विचारायला गेलों होतों बऱ्याच दिवसांमागं. "

" आतां यापुढं जाऊं नका. तिची चालचलणूक अलिकडे भारीच बिघडली आहे म्हणतात. " असें म्हणून ती आपल्या कामाला लागली.

त्यानंतर आणखी कांहीं दिवस असेच निघून गेले. रोज सूर्य उगवत होता आणि मावळत होता. त्याला धरून ठेवणं कठीण होतं म्हणूनच हिंवाळा निघून गेला. उन्हाळासुद्धां जाऊं जाऊं म्हणत होता. विराजच्या चेहऱ्यावर आलेली गाढ छाया जास्त जास्त वाढूं लागली होती. डोळ्यांतली चांदणी थकल्यासारखी दिसे, तशीच खडतर झाल्याचा भास होई. कुणाची तिच्याकडे नजर गेली तर आपोआप त्याचे डोळे बाजूला झुकून जात. सापाला सुळानें टोंचला म्हणजे त्या सुळाला दंश करीत करीत थकून तो जसा गळाठून पहात रहातो, तशीच

विराजची दृष्टि तितकीच करुण आणि तितकीच भीषण होऊन राहिली होती.

नवऱ्याबरोबर तिचें बोलीभाषण बहुधा बंद झालें होतें. तो घरीं येतांना चोरासारखा केव्हां येई आणि केव्हां निघून जाई, तिकडे ती ढुंकूनही पहात नसे. सर्वांनीच तिची भीति घेतली होती. भीत नव्हती एक धाकटी सूनबाई. वेळ सांपडली कीं जेव्हां तेव्हां येऊन ती तिला सतावीत असे. पहिल्या पहिल्यानें तिला चुकवायचा विराजनें पुष्कळ प्रयत्न केला. परंतु तें कांहीं शक्य झालें नाहीं. डोळे वटारले तर ती गळयाला मिठी मारी कडक भाषा वापरली तर पायाला विळखा घाली.

तो दसऱ्याचा दिवस होता. भल्या पहांटे उठून मोहिनी चोरट्या पावलानें आली आणि हट्ट घेऊन बसली. म्हणाली, " अजून कुणी उठलं नाहीं जाऊबाई. चला एकदां जाऊन नदींत बुडी मारून येऊं. "

पलतीरावर जमीदाराचा घाट तयार झाल्यापासून नदीवर जायला बंदी झाली होती.

दोघी जावा स्नान करण्यासाठीं नदीवर गेल्या. स्नान संपवून पाण्यांतून बाहेर येऊन पहातात तों जवळच एका झाडाखालीं जमींदार राजेंद्रकुमार उभा असल्याचें त्यांना दिसून आलें. अजूनही त्या जागीं काळोखाचें आवरण नाहींसें झालें नव्हतें. तरीही त्या दोघींनीं त्या माणसाला ओळखलें.

मोहिनी घाबरली. तिचे पाय लटपटूं लागले. ती विराजच्या आडोशाला उभी राहिली. विराजला अतिशय आश्चर्य वाटलें—एवढ्या भल्या पहाटे हा माणूस आला कसा ? कदाचित् रोजच तो असा पहारा करीत रहात असावा अशीही शंका लगेच तिच्या मनांत उत्पन्न झाली. एक क्षणभरच विराजचें मन मागें पुढें झालें. लगेच धाकट्या जावेचा हात धरून तिला ओढीत ती म्हणाली. " थांबली आहेस कशाला ? चल ये. "

तिला हातीं धरून झपाझप पावलें टाकीत ती पुढें जात होती; पण तितक्यांत मनांत कांहीं कल्पना येऊन ती थांबली आणि धीरगंभीरपणें राजेंद्राच्या समोर येऊन उभी राहिली.

तिच्या दोन्ही डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या उडत होत्या. त्या अंधुक प्रकाशांतसुद्धां तिच्या डोळयाला डोळा देण्याची राजेंद्राला छाती झाली नाहीं. त्यानें एकदम मान खालीं घातली.

विराज म्हणाली, " आपण घरंदाज माणूस—घरंदाजाची अवलाद—काय ही खोड लागली आहे आपल्याला ? "

राजेंद्र हतबुद्ध होऊन गेला होता. उत्तर काय द्यावें हें त्याला सुचेना.

विराज बोलत होती, "—आपली जमीनदारी फार मोठी असेल पण जिथं आतां तुम्ही उभे राहिलां आहांत ती जागा आमची आहे—" त्याच हाताच्या बोटानें पलीकडचा घाट दाखवीत ती म्हणाली, "—आपण किती हलकट आहांत तें त्या घाटावरच्या लांकडाच्या बारीकशा काटकीला सुद्धां कळून चुकलंय—मलाही कळलंय. आपल्याला कुणीं आईबहीण नाहीं वाटतं ? इथं पाऊल टाकूं नका म्हणून एकदां आमच्या मोलकरणीकरवीं तुम्हांला निरोप पाठवला होता, तो पोंचला नाहीं वाटतं आपल्याला ? "

एवढें झालें तरी राजेंद्रच्या तोंडून शब्द निघेना, इतका तो गळाटून गेला होता.

विराज म्हणाली, " माझ्या नवऱ्याला आपण ओळखत नाहीं. ओळखलं असतं तर असे आलां नसतां. म्हणून आज तुम्हाला पुनः सांगतें, पुनः इथं यायच्या पूर्वीं एकदां त्यांची चांगली ओळख करून घ्या. " असें म्हणून ती एकदम तिथून चालती झाली.

घरांत शिरत असतांना तिला दिसून आलें, कीं पीतांबर गडवा हातीं घेऊन उभा आहे.

आज कित्येक दिवस त्यांचें बोलीभाषण नव्हतें. तरीही तिला हांक मारून तो म्हणाला, " थांबा वहिनी, आतां एवढा वेळ ज्याच्याबरोबर बोलत होतां तोच नो जमीदारबाबू ना ? "

एका क्षणांत विराजचा चेहरा गोरामोरा झाला. नुसतें 'हो' म्हणून ती घरांत निघून गेली.

आंत जातांच स्वतःची जाणीव ती पार विसरून गेली—तिचें मन अतिशय उद्विग्न झालें तें धाकट्या सूनबाईसाठीं. ती आपल्या बरोबर आली होती हें पीतांबरभावजींनीं पाहिलें कीं काय याचीच चिंता तिला वाटत होती. पण तिला फार वेळ संशयांत रहावें लागलें नाहीं. पांच दहा मिनिटांतच पलीकडच्या घरांतून माराचा आवाज आणि त्याबरोबरच दांतओंठ खाऊन रडें दाबल्याचा आवाज तिला ऐकूं आला.

धांवतच ती सैंपाकघरांत गेली आणि लांकडाच्या पुतळी सारखी तेथेंच बसून राहिली.

झोंपेंतून उठून नीलांबर नुकताच बाहेर येऊन तोंड धूत होता. पीतांबरची आरडाओरड आणि त्याबरोबरच माराचा आवाज त्याच्या कानीं येतांच, लाथ मारून त्यानें मधला कूड मोडून टाकून पलीकडच्या घरांत प्रवेश केला.

कूड मोडल्याचा आवाज ऐकून पीतांबर दचकला. वळून पहातो तों समोर यमासारखा त्याचा थोरला भाऊ उभा होता. त्याचा चेहरा पांढरा फटक पडला.

जमीनीवर पडलेल्या धाकट्या भावजयीला उद्देशून नीलांबर म्हणाला, "आंत जा सूनबाई, कांहीं भिऊं नकोस."

मोहिनी कांपत कांपत उठली आणि आंत गेली. अगदीं शांतपणें नीलांबर म्हणाला, "धाकट्या सूनबाईसमोर तुझी विटंबना मी करीत नाहीं. पण एवढं माझं सांगणं ध्यानांत ठेव—चुकून सुद्धां विसरूं नकोस—जोंपर्यंत मी या घरांत आहें तोंपर्यंत असलं कांहीं चालायचं नाहीं. तिच्या अंगावर हात टाकलास तर तो हात मी असा मोडून टाकीन—" असें म्हणून तो जायला निघाला.

जिवाचा धडा करून, उसनं अवसान आणून पीतांबर म्हणाला, "कूड फाडून मला मारायला आलांत—पण कारण कळलंय ?"

जात असतां थांबून वळून नीळांबर म्हणाला, "नाहीं. आणि कळायला नकोही आहे मला."

पीतांबर म्हणाला, "कळायला नको म्हणे ! मला वाटतं कळलं असतं तर वडिलांची वास्तु सोडून पळून गेलां असतां !"

त्याच्या डोळ्याला डोळा देऊन रोखून पहात नीलांबर म्हणाला, "वास्तु सोडून कुणाला जावं लागेल तें मी जाणतों. त्याची उठाठेव तुला नको. पण तसं कांहीं झालं नाहीं तोंवर तुला सबूर करून रहावं लागेल. एवढंच तुला बजावून जातों आहें—" असें म्हणून तो जात होता तोंच पीतांबर एकदम त्याच्या समोर येऊन उभा राहिला आणि म्हणाला, "तर मग मीही तुम्हाला बजावतों आहे दादा, कीं दुसऱ्याला शिक्षा लावायच्या पूर्वीं आधीं आपल्या घरीं शिक्षा लावा."

नीलांबर नुसता पहात राहिला. पीतांबरचा धीर आतां चेपला होता. तो म्हणाला, "पल्याडचा घाट कुणाचा आहे माहीत आहे ? आहे ना ? तेवढ्यासाठींच मी हिला घाटावर जायला मनाई केली होती—आज

उजाडायच्या पूर्वी वहिनीबरोबर ही नदीवर स्नानाला गेली होती—कुणी सांगावं रोज अशाच जात असतील घाटावर. ”

नीलांबर आश्चर्यचकित होऊन म्हणाला, “ एवढ्यासाठींच का तिच्या अंगावर हात टाकलास ?

पीतांबर म्हणाला, “ आधीं ऐका. तो जमीदाराचा पोरगा आहे— राजेंद्रबाबू कीं कायसं नांव आहे त्याचं—मान्या जगांत प्रख्याति आहे त्याची—आज सारखी अर्धा तास वहिनी त्याच्याबरोबर बोलत उभी होती ! कां ? ”

त्याचें भाषण नीलांबरला चांगलेंसें कळलें नाहीं. तो म्हणाला, “ कोण बोलत होती रे ? विराजवहिनी ? ”

“ हो तीच. ”

“ तूं स्वतः पाहिलंस ? ”

हांसल्यासारखें करून पीतांबर म्हणाला, “ तुम्हाला माझं कांहींच पटत नाहीं तें मला माहीत आहे—त्याचा निकाल तो नारायण करील. पण—

नीलांबर धमकावून म्हणाला, “ पुनः तें नांव विटाळूं नकोस. काय बोलायचं असेल तें बोल. ”

पीतांबर दचकला, क्षणभर थांबला आणि रागारागानं म्हणाला, “ प्रत्यक्ष डोळ्याच्या साक्षीशिवाय बोलणारा माणूस मी नव्हें. आधीं आपल्या घरालाच शिस्त लावा—दुसऱ्याला उलटून मारायला येणं आतां पुरे करा. ”

नीलांबरच्या मस्तकावर अकस्मात् जणूं काय घर कोसळून पडलें. थोडा वेळपर्यंत तो त्याच्याकडे वेड्यासारखा पहात राहिला. शेवटीं त्यानं विचारलें. “ अर्धा घंटा बोलत होती ? कोण ? विराजवहिनी ? तूं डोळ्यांनीं पाहिलंस ? ”

पीतांबर एकदोन पावलं मागें हटला होता. तो थांबला आणि म्हणाला, “ होय, या डोळ्यांनीं पाहिलं. अर्धा घंटा तर खराच. कदाचित् जास्तही असेल.”

पुनः नीलांबर कांहीं वेळ त्याच्याकडे मुकाट्यानं पहात राहून म्हणाला, “ बरं ! बरं तसंही असेल. पण तशीच बोलायची जरूरी होती कीं नव्हती हें तुला कसं कळलं ? ”

तोंड फिरवून हंसून पीतांबर म्हणाला “ तें कांहीं मला माहीत नाहीं. तरीपण असं मारामारीला येणं कांहीं योग्य झालं नाहीं. हा घाट कांहीं माझ्या बायकोसाठीं तयार केलेला नाहीं ? ”

क्षणभर नीलांबर उसळून उठला. दोन्ही हात उगारून एकदम पुढें जात असतांच थांबला आणि पीतांबरच्या डोळ्याला डोळा देऊन म्हणाला, " पशू आहेस तूं! पण धाकटा भाऊ आहेस. मी मोठा भाऊ आहें. म्हणून आतां अधिक वाद करणार नाहीं. मी क्षमा केली तुला. पण लक्षांत ठेव—वडील माणसांना हें बोलला आहेस—ईश्वर तुला क्षमा करणार नाहीं—जा." असें म्हणून तो कुडाच्या दुसऱ्या बाजूला आला आणि मोडलेला कूड स्वतः दुरुस्त करूं लागला.

विराजनें कान लावून सारें कांहीं ऐकलें होतें. ती शरमिंदी झाली होती. तिटकारा आल्यामुळें नखशिखान्त ती शहारून उठली होती. तिला एकदां वाटलें, समोर जावें आणि सारी हकीकत सांगून टाकावी. पण तिचें पाऊल हालेना. आपल्या रूपावर परपुरुषाची वाईट नजर पडली आहे, ही गोष्ट स्वतःच्या तोंडानें नवऱ्यासमोर कशी सांगावी?

कूड बांधून देऊन नीलांबर निघून गेली.

दोन प्रहरीं भात वाढून विराज आड उभी राहिली. रात्रीं नवऱ्याला झोंप लागल्यावर गुपचुप बिछान्यावर येऊन पडली. आणि पहाटे तो जागा होण्या-पूर्वींच बाहेर निघून गेली.

अशा रीतीनें लपंडाव करीत तिनें दोन दिवस काढले. पण या मुदतींत नीलांबरनें तिला कांहींच विचारलें नाहीं. आतां एक निराळीच शंका तिच्या मनांत डोकें वर काढीत होती. आपल्या पत्नीवर एवढा मोठा आरोप केला असतां नवऱ्याची जिज्ञासा जागी होत नाहीं कशी, याचें सुसंगत कारण तिला शोधूनही सांपडेना.

या घटनेमुळें त्याला धक्का बसला आहे अशी कल्पना करून, स्वतःच्या मनाचेंही समाधान तिला करवेना.

हे दोन दिवस तोंड लपवून जसे तिनें काढले होते, तसेंच दुसऱ्या बाजूनें तिला पुनः पुनः वाटत होतें—आतां गोष्ट निघेल, आतां तो आपल्याला बोलावील काय झालं म्हणून विचारील आणि मग पहिल्यापासून झालेली सारी हकीकत त्याला सांगून टाकून नवऱ्याच्या पायतळीं हृदयावरचा अवजड बोजा उतरून ठेवून निर्धास्त होऊं. पण तसें कांहींच झालें नाहीं. नवरा एक शब्दही बोलेना-

कदाचित् या आरोपावर त्याचा मुळांतच विश्वास बसला नाहीं अशी

मनाची समजूत करून घेण्याचा प्रयत्न तिनें एकदां केला. पण तिला वाटलें, आतां या प्रकारें आपण सर्वस्वी त्याच्यासमोर तोंड लपवून दिवस काढले त्यामुळें त्याचा संशय मुळींच का जागा झाला नसेल ?

आज इतके दिवस ज्या गोष्टींचा आपण उच्चार केला नाहीं त्या गोष्टी आज आपण होऊन उच्चारायच्या कशा ?

तो दिवसही असाच निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं घाबरटपणानें ती घरचें काम आवरीत होती. हृदयांत कालवाकालव सुरू होती. एकदम तिच्या अंतःकरणाच्या तळांतून एक भयंकर कल्पना अकस्मात् उद्‌भवली—दीराच्या शब्दावर त्यांचा विश्वास तर बसला नाहीं.

आन्हिक उरकून नीलांबर उठत होता तोंच समोर उभी राहून ती वावटळी-सारखी सुस्कारे टाकूं लागली. आश्चर्यचकित झालेल्या नीलांबरनें डोळे वर करून पाहिलें, तों जोरानें आपला ओंठ चावून विराज म्हणाली, "कां ? मी काय केलंय ? एक शब्दसुद्धां कां बोलत नाहीं ?"

नीलांबर हंसला आणि म्हणाला, "तूंच दूर पळूं लागलीस तर बोलूं कुणाबरोबर ?"

"पळूं लागलें होय ? पण तुम्ही हांक मारली होती का एकदां तरी ?"

नीलांबर म्हणाला, "पळून जाणाऱ्या माणसाला हांक मारली तर पाप लागतं."

"पाप लागतं होय ? तर मग भावजींचं म्हणणं तुम्हाला खरं वाटलं तर ? होय ना ?"

"खऱ्याला खरं म्हणूं नये ?"

रागाच्या भरांत दुःखाचा उमाळा येऊन विराज एकदम रडूं लागली. तशाच दाटल्या आवाजानें ती किंचाळून म्हणाली, मुळींच खरं नाहीं. एकदम खोटी गोष्ट—भयंकर खोटी गोष्ट ! कां तुम्हाला ती खरी वाटली ?"

"नदीकांठीं तूं बोलत राहिली नव्हतीस ?"

निर्भयपणानें विराजनें उत्तर दिलें, "हो बोलत होतें."

नीलांबर म्हणाला, मी एवढंच खरं मानलं."

आपल्या हातानें आपले डोळे पुसून विराज म्हणाली, "जर खरं मानलंत तर त्या हलकटानें केली तशी शिक्षा मला सुद्धां कां केली नाहीं ?"

नीलांबर पुनः हंसला. नुकत्याच उमललेल्या फुलासारखा त्याचा चेहरा निर्मळ हास्यानें उजळून उठला. उजवा हात उगारून तो म्हणाला, " तर मग जवळ ये. लहानपणच्या सारखा एकदां तुझा कान चांगला पिळतों. "

विराज एकदम धांवतच आली आणि गुडघे टेंकून त्याच्यासमोर बसली. लगेच उठून उभी राहून त्याच्या वक्षःस्थलावर ती कोसळून पडली. नवऱ्याच्या गळ्याला दोन्ही हातांनीं मिठी मारून ती फुलून फुलून रडूं लागली.

नीलांबरनें तिचें रडें थांबवलें नाहीं. त्याचे स्वतःचे डोळेही आंसवांनीं ओलावले होते. पत्नीच्या मस्तकावर उजवा हात ठेवून तो तिला आशीर्वाद देऊं लागला.

थोड्या वेळानें रडण्याचा आवेग कमी होतांच तोंड वर करून न पाहतां ती म्हणाली, " त्याच्याशीं काय बोललें माहीत आहे ? "

मोठ्या प्रेमळपणानें नीलांबर म्हणाला, " माहीत आहे ! इकडे येऊं नको म्हणून त्याला बजावलंस ? "

" कुणी सांगितलं तुम्हाला ? "

नीलांबर हंसून म्हणाला, " कुणीसुद्धां सांगितलं नाहीं. कुणा अनोळखी माणसाबरोबर ज्याअर्थी बोललीस त्याअर्थी तेवढाच नाइलाज व्हायला हवा ! अशा वेळीं याखेरीज दुसरं काय बोलणार विराज ? "

विराजच्या डोळ्यांत पुन्हां आसवांच्या धारा वाहूं लागल्या.

नीलांबर बोलत होता, "—पण एकंदरींत हें कांहीं बरं झालं नाहीं. तूं मला सांगितलं पाहिजे होतंस. मी जाऊन त्याला चांगली समज दिली असती. फार दिवसांपूर्वींपासून मला त्याचा संशय येत होता. वेळीं अवेळीं केव्हां केव्हां तो आलेला मला दिसत होता. पण तूं मला विरोध केला होतास म्हणून मी कधींच कांहीं बोललों नव्हतों. "

त्या दिवशीं संध्याकाळपासून आभाळ भरून आलें होतें. मधून मधून पावसाच्या सरी येत होत्या. रात्रीं बिछान्यावर पडल्यावर नवराबायकोचें भाषण पुनः सुरू झालें.

नीलांबर म्हणाला, " आज सारा दिवस तो येईल म्हणून दबा धरून बसलों होतों. "

विराज घाबरून म्हणाली, " कां ? कां ? "

" त्याला चार शब्द सुनावले नाहींत तर देवाच्या घरीं मी अपराधी ठरेन म्हणून. "

विराज घाबरली. एकदम उठून बसली आणि म्हणाली, " नाहीं नाहीं. असं कांहीं करूं नका. मुळींच पडूं नका त्या भानगडींत. ही गोष्ट काढून एक शब्द सुद्धां बोलायचा नाहीं त्याला. "

तिची ती विलक्षण मुद्रा पाहून नीलांबरला अत्यंत आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, " मी नवरा आहें. नवरा म्हणून माझं कांहीं कर्तव्य आहे ना ? "

एवढा सुद्धां विचार न करतां विराज बोलून गेली, " नवऱ्याचीं इतर कर्तव्यं आहेत तीं आधीं पार पाडा आणि मग या कर्तव्याला हात घाला. "

" कोणतीं ? " असें म्हणून नीलांबर क्षणभर स्तंभित होऊन थांबला शेवटीं हळूच " ठीक आहे ! " म्हणाला आणि एक मोठा सुस्कारा सोडून पाठ वळवून मुकाट्यानें झोंपी गेला.

विराज तशीच स्तब्ध होऊन बसली होती. तिला वाटलें, " एकदम आपल्या तोंडांतून काय हे भलतेच शब्द निघून गेले ? "

पावसाळ्यांतलें पहिलें पाणी पडत असल्याचा नाजुक आवाज खिडकींतून आंत ऐकूं येत होता. कोरड्या मातीवर पाणी पडल्यानंतर येणारा बाहेरचा सुगंध आंत दरवळत होता. आंत तीं नवराबायको चुपचाप होऊन स्तब्ध राहिलीं होतीं.

बराच वेळ निघून गेल्यावर नीलांबर केविलवाण्या स्वरानें आपल्याशींच बोलल्यागत उद्गारला, " केवढा नालायक माणूस आहे मी ! विराज, हें तूं जसं दाखवून देतेस तसं दुसऱ्या कुणीच मला दाखवून दिलं नव्हतं. "

विराजला उत्तर देण्याचा उमाळा आला होता पण तिच्या तोंडावाटे शब्द बाहेर फुटला नाहीं.

असह्य दुःख आणि दारिद्र्य यांनीं गांजलेल्या या जोडप्यांत फारा दिवसांनीं झालेल्या समेटाच्या पहिल्या गांठींत तो शब्द छिन्नमिन्न होऊन गेला.

## १०

दुपारच्या वेळीं कोण कुठें नाहीं असें पाहून मोहिनी आली आणि विराजच्या पायाजवळ येऊन रडत रडत खालीं पडली. नवऱ्याकडून घडलेल्या अपराधांच्या भीतीनें व्याकुळ होऊन आज दोन दिवस ती सारखी या संधीची वाट पहात होती. ती रडत रडत म्हणाली, " शापबीप कांहीं देऊं नका जाऊबाई. माझ्याकडे

पाहून त्यांना क्षमा करा. त्यांना कांहीं झालं तर मी जगायची नाहीं. ”

विराजनं आपल्या हातांनीं धरून तिला वर उठवून बसवलें.

तिला दुःख वाटलें होतें—तरीही गंभीरपणें ती म्हणाली, “ मी शापबीप कांहीं देणार नाहीं ताई. माझं वाईट करायचं त्यांच्या हातीं नाहींच नाहीं. पण तुझ्यासारख्या सतीलक्ष्मीच्या अंगावर त्यांनीं विनाकारण हात टाकला हें मात्र आई दुर्गेला मानवणार नाहीं ! ”

मोहिनी शहारून उठली. डोळे पुसून घेऊन ती म्हणाली. “ काय करायचं जाऊबाई ? त्यांचा स्वभावच असा. ज्या देवानं त्यांना हें असं रागीट बनवलं तोच क्षमा करील त्यांना. कुठल्याही देवदेवतेला नवस करायचं कांहीं मी ठेवलं नाहीं; पण मीच मुळीं महापापी. माझी हांक कांहीं कुठल्याही देवदेवतेच्या कानीं पोंचली नाहीं. असा एक सुद्धां दिवस जात नाहीं जाऊबाई—” असं म्हणून ती एकदम थांबली.

मोहिनीच्या कपाळाच्या उजव्या बाजूला वांकडा काळा डाग पडला होता, तो अजून विराजच्या नजरेला आला नव्हता.

तो दिसून येतांच ती घाबरून म्हणाली, “ तुझ्या कपाळावर हा डाग माराचाच का ग ? ”

लाजेनं मान खालीं घालून मोहिनीनं माननेंच होकार दिला.

“ कशानं मारलं ? ”

नवऱ्याच्या या असल्या वर्तनामुळें मोहिनीला शरम वाटत होती. तोंड वर करून बघणें तिला कठीण गेलें. तशीच खालच्या माननें ती हळूच म्हणाली, “ राग आला कीं त्यांना कपलीच शुद्ध रहात नाहीं जाऊबाई. ”

“ तें माहीत आहे मला—पण त्यांनीं मारलं कशानं ? ”

तशाच खालच्या माननें मोहिनीनं उत्तर दिलें, “ पायांत चढाव होता—”

विराज एकदम स्तब्ध झाली, ताठून बसली—तिच्या दोन्ही डोळ्यांतून आग बाहेर पडत होती. मनांत येत असलेली चीड दाबून ती तोंड वेंगाडून म्हणाली, “ कसं हें सहन करते आहेस मोहिनी ? ”

एकदां वर पाहून मोहिनी म्हणाली, “ मला आतां संवय झाली आहे जाऊबाई. ”

हें उत्तर विराजच्या कानीं गेलें नाहीं. तितकीच चिडून ती उद्गारली, "—अन् या असल्या माणसासाठीं क्षमा मागायला आलीस ?"

धाकटी जाऊ मोठ्या जावेच्या तोंडाकडे पहात म्हणाली, "होय जाऊबाई, तुम्ही आशीर्वाद दिला नाहीं तर त्यांचं अकल्याण होईल, अन् सहन करण्या-बाबत म्हणशील तर जाऊबाई, तुझ्याचपाशीं मी शिकलेंय. माझं म्हणून जें कांहीं आहे तें सारं कांहीं तुझ्यापायीं—"

उतावीळपणानें विराज म्हणाली, "नाहीं—मोहिनी, नाहीं—उगीच खोटं बोलूं नकोस. असला अत्याचार मला सहन व्हायचा नाहीं."

मोहिनी जरा हंसून म्हणाली, "स्वतःचा अपमान सहन करणं म्हणजे सहनशक्तीची कमाल करणं होईल. तुझ्यासारखं नवऱ्याचं भाग्य जगांत थोड्याच बायकांच्या नशिबीं लागतं. तरीसुद्धां तूं जें सोशीत आली आहेस तें सोसायला गेलं तर आमचा लोळागोळा होऊन जाईल. चेहऱ्यावर हसूं नाहीं, अंतरंगांत सुखाचा लेश नाहीं, हें असलं नशिब रात्रंदिवस उघड्या डोळ्यांनीं पहात राहिली आहेस. असल्या या नवऱ्यापाशीं मिळत असलेला हा मुका मार तुझ्याखेरीज दुसऱ्या कुणालाच सहन व्हायचा नाहीं जाऊबाई."

विराजनें एक शब्दही उच्चारला नाहीं.

एकदम हात पुढें करून मोहिनीनें तिचे दोन्ही पाय कवटाळून धरले आणि म्हटलें, "बोल, त्यांना क्षमा केली म्हण. तेवढे शब्द तुझ्या तोंडून ऐकल्या-शिवाय मी मुळींच सोडायची नाहीं. तूं प्रसन्न झाली नाहींस तर कुठल्याच देवाला त्यांची राखण करतां यायची नाहीं जाऊबाई."

विराजनें आपले पाय मागें घेतले आणि धाकट्या जावेच्या हनवटीला हात लावून ती म्हणाली, "क्षमा केली."

पुनः एकदां तिच्या पायावर डोकें ठेऊन आनंदित मुद्रेनें मोहिनी निघून गेली.

पण विराज मात्र किती तरी वेळ झपाटल्यासारखी होऊन तिथेंच बसून राहिली होती. हृदयाच्या अंतःस्थलांतून कुणीतरी पुनः पुनः हांक मारून 'हें पहा आणि धडा घे विराज !' म्हणत होतें.

यानंतर बरेच दिवसपर्यंत मोहिनी या घरीं आली नाहीं; तरीही एक डोळा आणि एक कान या बाजूला देऊन ती राहिली होती. एके दिवशीं एक वाजायच्या सुमाराला इकडे तिकडे न्याहाळीत, अत्यंत सावधपणानें ती या घरांत आली.

गालावर हात ठेऊन विराज स्वैपाकघराच्या एका बाजूला स्तब्ध बसून राहिली होती—ती आली तरीही तशीच बसून राहिली होती.

मोहिनी जवळ येऊन बसली आणि तिच्या पायाला हात लावून नमस्कार करून म्हणाली, " वेड लावून घ्यायचं आहे का जाऊबाई ? "

मान वळवून विराज तणतणत उद्गारली, " तूं होतीस ना ? "

मोहिनी म्हणाली, " स्वतःबरोबर तुलना करून मला लाजवूं नकोस जाऊबाई, तुझ्या पायाच्या धुळीचीही मला सर नाहीं. पण तूंच सांग, कां हें असं झालं ? आज थोरल्या भावजीना कां जेवूं दिलं नाहींस ? "

" मी कांहीं त्यांना जेवूं नका म्हटलं नाहीं. "

मोहिनी म्हणाली, " तसं तूं म्हटलं नाहींस हें खरं; पण एकदां कां गेली नाहींस ? ताटावर बसून त्यांनीं किती वेळ हांका मारल्या—पण तूंच सांग, अशानं माणसाला वाईट नाहीं का वाटायचं ? एकदां तरी जवळ गेली असतीस तर ते ताट लोटून असे निघून गेले नसते. "

विराजनं कांहींच उत्तर दिलें नाहीं.

मोहिनी बोलत होती, " —कामांत गुंतलें होतें म्हणून मला फसवतां यायचं नाहीं तुला जाऊबाई. आजवर सारं कामकाज टाकून त्यांच्यासमोर त्यांना जेवायला लावीत होतीस. त्यापेक्षां दुसरं कांहीं मोठं काम आहे असं केव्हांच तुला वाटलं नव्हतं. आज—"

तिचं भाषण पुरें होण्यापूर्वीं पिसाळल्याप्रमाणें तिचा हात धरून जोरानं ओढून घेऊन विराज म्हणाली, " तर मग ये अन् पहा. "

ओढीत ओढीत तिला घेऊन ती स्वयंपाकघरांत आली आणि तिला उभी करून हातानं दाखवून म्हणाली, " पहा आतां हें. "

मोहिनीनं पाहिलें,—काळ्या दगडींत मोठ्या असड तांदळाचा भात आणि त्याच्याच शेजारीं कसल्या तरी हिरव्या गवतपाल्याची भाजी ठेवलेली होती. दुसरें कांहींच नव्हतें.

निरुपाय झाल्यामुळें नदीकांठचें कसलें तरी हिरवें गवत आणून उकडून तिनं तें वाढून ठेवलें होतें.

पहातां पहातां मोहिनीच्या डोळ्यांतून सारखीं आंसवें वाहूं लागलीं. पण विराजच्या डोळ्यांत पाण्याचें टिपूससुद्धां दिसत नव्हतें. तोंडांतून एक शब्दसुद्धां न काढतां दोन्ही जावा एकमेकांच्या तोंडाकडे नुसत्या पहात राहिल्या होत्या.

खणखणीत भाषेंत विराज म्हणाली, " तूं सुद्धां बायको माणूस आहेस. तुला देखील अन्न उकडून नवऱ्याचं पान मांडावं लागतं. आतां तूंच सांग, असलं हें अन्न ताटांत वाढून नवऱ्यासमोर बसवेल का कुणा सटवीला ? आतां बोल—अगदीं तोंडाला येईल तें बोल—अगदीं शिव्यागाळी द्यायच्या असल्या तरी बोल—मी एक शब्दसुद्धां उलटून बोलणार नाहीं. "

मोहिनी स्तब्ध झाली. तिच्यानें एक शब्दही बोलवेना. तिच्या डोळ्यांतून सारखें घळघळ पाणी वहात होतें.

विराज बोलत होती, " —कधीं चुकून सैंपाक बिघडला अन् त्या दिवशीं घासभर भात त्यांना कमी गेला तर सारा दिवस माझ्या काळजाला सुया टोंचतात. कुणाला नसलं तरी तुला माहीत आहे—भुकेच्या वेळीं आज हें असलं अन्न आणून द्यावं लागलं—उद्यां कदाचित् हें सुद्धां मिळायचं नाहीं ! "

तो उद्वेग तिला अनावर झाला. धाकट्या जावेच्या गळीं पडून दोन्हीं हातांनीं तिला घट्ट कवटाळून ती फुलून फुलून रडूं लागली. एका कुसव्याच्या बहिणीप्रमाणें त्या दोन्ही बायका कितीतरी वेळ एकमेकींना कवटाळून राहिल्या होत्या—किती तरी वेळ तीं दोन्हीं स्त्रीहृदयें बिनबोलाच्या आंसवांनीं भिजून चिंब होत होतीं.

थोड्या वेळानें नजर वर करून विराज म्हणाली, " नाहीं—कांहींच लपवणार नाहीं तुझ्यापाशीं. माझं दुःख जाणवेल असं तुझ्याखेरीज दुसरं कोण आहे मला ? खूप विचार करून पाहिला मी—मी दुरावल्याशिवाय त्यांच्या हालअपेष्टा थांबायच्या नाहींत. इथं राहिलें तर डोळे भरून तें तोंड पाहिल्याशिवाय माझा दिवस जायचा नाहीं—अन् तें तर आतां पाहवत नाहीं. मी आतां जाणार ! बोल, मी गेलें कीं त्यांची काळजी घेशील ? "

मोहिनीनें वर पाहून विचारलें, " कुठं जाणार आहेस ? "

विराजच्या कोरड्या ओंठावर कठोर हंसण्याची कोंवळी रेषा उमटली. क्षणभर तिचें मन मागेंपुढें झालें. नंतर ती म्हणाली, " कुठं जावं लागेल तें कसं सांगूं ताई ? अशा रीतीनें निघून जाण्यासारखं दुसरं पाप नाहीं म्हणून मी ऐकलं आहे. तें कांहींही असो, या यातना तरी मिटतील ! "

आतां मात्र मोहिनीला कळून आलें. ती एकदम शहारली. घाबरून तिच्या तोंडावर हात ठेवून ती म्हणाली, " छेः छेः ! असं कांहीं बोलूं नकोस

जाऊबाई ! आत्महत्त्येचा उल्लेख करणं म्हणजे पाप—तो ऐकणं सुद्धां पाप ! काय ही तुझी दशा झाली ! ”

तिचा हात दूर लोटून विराज म्हणाली, “ कोण जाणें काय झालं तें. आज कळतं आहे एवढंच. त्यांच्या ताटांत घांसभर अन्न घालणं आतां शक्य नाहीं. वाटेल तें करून दोघां भावांत सख्य घडवून आणीन म्हणून माझ्या गळयाला हात लावून शपथ घे—”

“ वचन देतें—” असें म्हणून मोहिनी एकदम खालीं बसली आणि तिचे दोन्ही पाय घट्ट धरून म्हणाली, “ आतां तूंही मला एक भीक घातली पाहिजेस !”

विराजनें विचारलें “ कोणती ? ”

“ तर मग एक मिनिट थांब. ही मी आलेंच—” असें म्हणून ती जायला निघत होती तोंच तिचा पदर ओढून धरून विराज म्हणाली, “ थांब. जाऊं नकोस—मी एक तीळ सुद्धां घेणार नाहीं कुणाकडचा. ”

“ कां घेणार नाहीं ? ”

नकारार्थी सारखी मान हलवीत विराज म्हणाली, “ नाहीं. नाहीं. तें होणं नाहीं ? कुणाकडून कांहीं सुद्धां घ्यायची नाहीं मी. ”

मोहिनी थोरल्या जावेच्या तोंडाकडे पहात राहिली होती. एकाएकीं ती अशी उसळून उठली कां, याचें तिला आश्चर्य वाटलें. मोहिनी एकदम तिथेंच बसली आणि जावेला बळेंच जवळ बसवून घेऊन म्हणाली, “ तर मग ऐक जाऊबाई. कां कोण जाणें, पूर्वीं मी तुमची नावडती होतें—एक बरा बोल सुद्धां तुम्ही माझ्याशीं बोलत नव्हतां म्हणून चोरून लपून रडत असें. किती देवदेवींना साद घालीत होतें त्याला सीमा नाहीं ! आज त्यांतलं कुणीतरी प्रसन्न झालं. ‘ ताई ’ म्हणून तूं मला हांक मारलीस. आतां तूंच एकदां चांगला विचार करून पहा—मी अशाच संकटांत असतें तर कांहींसुद्धां न करतां स्वस्थ राहवलं असतं का तुझ्याच्यानं ? ”

या प्रश्नाचें उत्तर विराजला देतां आलें नाहीं. मान खालीं घालून ती स्वस्थ राहिली.

मोहिनी निघून गेली आणि थोड्याच वेळांत एका मोठ्या थाळींत सारे जिन्नस भरपूर वाढून घेऊन ती थाळी तिनें तिच्यासमोर आणून ठेवली.

विराज तटस्थ होऊन पहात होती. पण जेव्हां ती जवळ आली आणि

तिच्या पदराचें टोंक हातीं घेऊन गांठीला एक मोहोर बांधूं लागली, तेव्हां विराज एकदम बेभान झाली. मन अनावर होऊन जोरानें मोहिनीला लोटून ती किंचाळून म्हणाली, "नाहीं! नाहीं! तें व्हायचं नाहीं!—मेलें तरी व्हायचं नाहीं!"

तिचा धक्का सांवरून समोर येऊन मोहिनी म्हणाली, "कां व्हायचं नाहीं? झालंच पाहिजे! घेतलंच पाहिजे! माझ्या आजोबांनीं दिली होती ती मला लग्नाच्या वेळीं—" असें म्हणून मोहोर तिच्या पदराच्या गांठीला बांधून, तिच्या पायाला हात लावून तिनें नमस्कार केला आणि त्याच पावलीं ती तिथून निघून गेली.

## ११

इतके दिवस चालत असलेला मोग्राचा पितळेचा कारखाना एके दिवशीं अचानक बंद झाला. ही हकिकत सांगायला तीच अस्पृश्य मुलगी विराजकडे आली. सांच्याला आतां गिऱ्हाईक नसल्यामुळें आपली कशी गैरसोय झाली आहे, किती नुकसान झालें आहे वगैरे गोष्टीबद्दल ती ऐसपैस बोलूं लागली. ती हकिकत विराजनें अगदीं मुकाट्यानें ऐकली. त्यानंतर तिनें एक लहानसा सुस्कारा सोडला एवढेंच. आपल्या दुःखाला भागीदार मिळाला नाहीं असें पाहून ती मुलगी निराश होऊन निघून गेली.

अरेरे! गरीब बिचारी दुःखी दरिद्री पोर! त्या लहानशा निःश्वासांत काय काय सांठवलं होतें? त्या मुकाटपणामागें केवढं वादळ उठलं होतें, तें त्या पोरीला कसें कळावें? वर शांत दिसणाऱ्या पृथ्वीच्या पोटांत केवढी आगीची खाई धगधगत असते तें कळायची ताकद त्या गरीब पोरीला कुठून असणार?

नीलांबर येऊन म्हणाला, कीं आपल्याला नोकरी मिळाली. येत्या दुर्गापूजेच्या उत्सवदिनापासून कलकत्त्याच्या एका प्रख्यात भजनीं मंडळांत 'खोल' (मृदंग) वाजवण्याची ती नोकरी होती.

ती बातमी ऐकतांच विराजचा चेहरा रक्तहीन प्रेताच्या चेहऱ्यासारखा निस्तेज पडला. तिचा नवरा—सभ्य माणूस—त्यानें गणिकेच्या हाताखालीं—गणिकेच्या मागें—साऱ्या सभ्य समाजाच्या समोर तबलामृदंग वाजवीत का फिरावें? तरच का हातातोंडाची गांठ पडणार?

शरमेनं ती जमीनदोस्त होण्याच्या बेताला आली होती, पण तोंड वर करून ‘ नको ’ म्हणायचं धैर्य तिला होईना. आतां दुसरा उपायच नव्हता. संध्याकाळच्या काळोखांत तिच्या चेहऱ्यावरची कळा नीलांबरला दिसून आली नाहीं तें एका अर्थी बरेंच झालें.

ओहोटीच्या ओढीनं प्रत्येक घटकेला पाणी ओसरत जातांना कांठावर रेषा उमटवीत जसें दूर दूर हटत जातें, अगदीं त्याचप्रमाणें विराज वाळत चालली होती. अगदीं त्याचप्रमाणें तिच्या देहतटावरची सारी मलिनता सारखी उघडकीस आणून तिचें तें स्वर्गीय आणि अतुलनीय सौंदर्य कुठल्याकुठें कसें नाहींसं झालें होतें, तें अगदीं तसेंच स्पष्ट रीतीनं दिसून येत होतें. देह वाळलेला, तोंड कोमेजलेलें, दृष्टि अस्वाभाविक झालेली—जणूं काय कांहींतरी भयंकर वस्तु तिला सारखी समोर दिसत होती !

आणि अशा या स्थितींत तिला पाहायला कुणीच नव्हतें. होती काय ती धाकटी जाऊ. ती सुद्धां महिनाभऱ्यापूर्वी भाऊ आजारी झाल्यामुळें माहेरीं गेली होती. सारा दिवस नीलांबर घरीं असा क्वचितच असे. घरीं येई तो रात्रीं काळोख पडल्यावर. दोन्ही डोळे गुलावी छटेनं रंगलेले. निःश्वास गरम झालेले. ती त्याची सारी हालत विराजला दिसून येत होती.

तिला सारें कांहीं कळत होतें. पण ती एक शब्दसुद्धां बोलत नव्हती—बोलायचें तिच्या जिवावर येत होतें. रोजचें मामुली भाषण बोलतांनासुद्धा आतां तिला थकवा येत होता.

आज कित्येक दिवस तिसऱ्या प्रहरापासून तिला थंडी भरून ताप येत असे—मस्तक भयंकर दुखत असे. अशा स्थितींतच सांजवात करण्यासाठीं तिला स्वैंपाकघरांत जावें लागत असे. नवरा मुळीं घरींच नसे, म्हणून दिवसा स्वैंपाक करण्याचें तिनें बंद केलें होतें. रात्रीं ती चुलीवर भात ठेवीत असे. पण हल्लीं तिचा ताप फार वाढला होता. नवऱ्याचें जेवण उरकलें कीं हातपाय धुऊन ती आडवी होत असे.

अशा विलक्षण परिस्थितींत ती आयुष्याचे दिवस कंठीत होती. देवदेवतांकडे ढुंकून पहाण्याची सुद्धां तिला इच्छा होत नसे. प्रार्थना, काकुळत्या आतां बंद झाल्या होत्या. रोजचें आह्निक पुरें झालें म्हणजे प्रणाम करून पदर पसरून ती एवढेंच मागणें मागे—“ देवा, ज्या मार्गाला लागलें आहें तो मार्ग एकदांचा आतां लौकर गांठू दे. ”

तो दिवस श्रावणाच्या संक्रांतीचा होता. सकाळपासून पावसाची सारखी झोड उठली होती—तिला खंड पडत नव्हता.

तीन दिवस पाळीचा ताप भोगून भुकेतान्हेनें व्याकुळ होऊन संध्याकाळीं विराज बिछान्यावर उठून बसली. नीलांबर घरीं नव्हता. बायकोला एवढा ताप आला असतांही परवांच श्रीरामपूरच्या एका धनाढ्य शिष्याच्या घरीं कांहीं तरी प्राप्तीच्या आशेनें त्याला जावें लागलें होतें. कांहीं झालें तरी तिथें कांहीं थांबायचें नाहीं असें ठरलें होतें. त्याच दिवशीं संध्याकाळीं तो निश्चित परत येणार होता. परवांचा दिवस गेला, कालचा दिवस गेला, आजचाही दिवस जायला आला तरी त्याचा पत्ता नव्हता.

कितीतरी दिवसांनीं आज सारा दिवसभर उठल्यासुटल्या तिला रडूं येत होतें. बिछान्यावर पडून राहणें तिला अशक्य झालें. सांजवात लावून झाल्यावर एक पंचा माथ्यावर घेऊन ती कांपत कांपत बाहेर आली आणि रस्त्याच्या कडेला येऊन उभी राहिली. पावसाळी काळोखांतून जितक्या दूर नजर पोंहोंचत होती तिथवर निरखून पहायचा तिनें प्रयत्न केला—पण कुठेंच कोण दिसत नसल्यामुळें ती परत आली. तिच्या अंगावरचे कपडे भिजले होते, केंस भिजले होते, अशा स्थितींत चंडीमंडपाच्या धक्क्याला टेकून ती बसली आणि थोड्या वेळानंतर पुनः रडूं लागली.

तिला वाटलें, त्याला काय झालें असेल! आधींच त्याचा देह दुबळा झालेला, हालअपेष्टांनीं गांजलेला, पोटभर अन्न नाहीं, त्यावर हे परिश्रम करावे लागलेले,—कुठें आजारी होऊन पडला कीं गाडी-घोड्याखालीं सांपडला—कीं काय झालें—कीं साराच सत्यानाश झाला—याची कल्पना तिला करवेना. घरीं बसून ती एकटी काय करणार होती? कुठें जाणार होती? कसला शोध करणार होती?

आणखी एक आपत्ति! पीतांबर सुद्धां घरीं नव्हता. काल तिसऱ्या प्रहरीं मोहिनीला आणण्यासाठीं तो तिच्या माहेरीं गेला होता. भरल्या घरांत विराज एकटी पडली होती. त्यांतून रोगानें अशी पिडलेली. आज दुपारपासून तिचा ताप निघाला होता. पण तोंडांत घालीन म्हणायला घरांत अन्नाचा एक कण सुद्धां नव्हता. दोन दिवस ती नुसती पाण्यावर राहिली होती.

पावसांत भिजल्यामुळें तिला थंडी भरून येऊं लागली. डोकें गरगरूं लागलें. जिवाचा धडा करून पायावर भर देऊन धक्क्याला हात धरीत ती उठली

आणि चंडीमंडपाच्या आंत जाऊन जमिनीवर उपडी पडून डोकें आपटून घेऊं लागली.

सदर दरवाजावर कुणीतरी ठोठावलें. विराजनें तिकडे कान देऊन ऐकलें. दुसरी थाप पडतांच 'आलें हं' असें म्हणून तिनें तशीच धांव मारीत जाऊन दरवाजा उघडला. एका क्षणापूर्वी तिला उठून बसायचीसुद्धां ताकद नव्हती.

दारावर थापा मारीत होता तो शेजारच्या वाडींतला एक शेतकऱ्याचा मुलगा होता. तो म्हणाला, " माईजी, दादाठाकुरनीं एक कोरडं धोतर मागितलं आहे. द्या ना."

विराजला चांगलेंसें कळलें नाहीं. दाराला धरून ती कशीबशी उभी राहिली होती. त्याच्याकडे कांहीं वेळ पाहून तिनें विचारलें, " धोतर मागितलंय ! कुठं आहेत ते ?"

मुलानें उत्तर दिलें, " गोपाळ ठाकूरच्या बापाच्या मर्तिकाला गेले होते. आतां परत आले आहेत."

" मर्तिकाला !" विराज स्तंभित झाली. गोपाळ चक्रवर्ती त्यांचा दूरचा नातेवाईक होता. आज कित्येक दिवस त्याचा म्हातारा बाप अंथरूण धरून होता. दोन तीन दिवसांपूर्वीं त्रिवेणींची गंगायात्रा करून आला होता. आज दोन प्रहरीं तो मृत्यु पावला. त्याला जाळून सारे सगळे नुकतेच परत फिरले होते.

त्या मुलानें ही सारी हकीकत सांगून शेवटीं म्हटलें, " दादाठाकूरसारखा माणूस या भागांत कुणी नाहीं मिळायचा. या कामीं त्याचा हात धरणारा दुसरा कुणी नव्हता. आज इतके दिवस ते त्या म्हाताऱ्याबरोबरच होते."

विराज कोलमडत आंत गेली. एक धोतर आणून त्याच्या हातीं देऊन पुनः ती बिछान्यावर पडली. घरांत चिटपांखरूं सुद्धां नाहीं, घर ओसाड पडलेलें, बायको एकटी तापानें पछाडलेली, उपासमारीनें मरायला टेकलेली, हें कळून सवरून जिचा नवरा परोपकारासाठीं गांवावर हिंडत राहतो, त्या दुर्भागी स्त्रीला बोलायला कसली जागा असणार ? बिघडलेल्या मेंदूनें तिच्या मनावर परिणाम केला होता. पुनः पुनः तिच्या अंतरंगांतून कठोर आवाज उठत होता, 'विराज, संसारांत तुझं म्हणायला कुणी नाहीं—तुला आई नाहीं, बाप नाहीं, भाऊ नाहीं—नवरा सुद्धां नाहीं. आहे नुसता यम. त्या यमाच्या घराखेरीज आसऱ्याला तुला दुसरी जागा नाहीं.'

बाहेर पाऊस कोसळत होता. रातकिडे किरकिरत होते. वारझडीच्या आवाजासरशीं ' नाहीं—नाहीं ' असा आवाज तिच्या दोन्ही कानांत शिरून तिला भणाणून सोडीत होता !

कोठींत तांदुळ नाहींत, कुणग्यांत धान्य नाहीं, बागेंत फळ नाहीं, तळ्यांत मासा नाहीं !—मनांत सुख नाहीं, शांति नाहीं, स्वास्थ्य नाहीं !—शेजारीं धाकटी जाऊ नाहीं आणि विशेषांत विशेष म्हणजे नवराही घरीं नाहीं. विशेष आश्चर्य हें, कीं त्याच्या या वागणुकीमुळें तिच्या मनांत यावेळीं संतापाचें एवढें सुद्धां लक्षण उत्पन्न झालें नाहीं.

एक वर्षापूर्वीं याच्या शतांशानें जरी त्यानें निष्काळजीपणा दाखवला असता तर ती संतापानें वेडी झाली असती—पण आज तिला अशी कांहीं ग्लानि आली होती, कीं तिच्यामुळें ती जडमूढ होऊन गेली होती.

निर्जीवासारखी पडून राहून ती एक एक विचार करीत होती—चिंतन करीत होती—तिच्या साऱ्या साऱ्या विचारांचा घोंटाळा उडाला होता !—तितक्यांत रोजच्या संवयीनुसार एकाएकीं तिला आठवण झाली,—साऱ्या दिवसांत तो उपाशीं तर नसेल ?

आतां तिच्यानें पडून राहवेना. घाईघाईनें ती बिछान्यावरून उठली हातीं दिवा घेऊन कोठींत गेली. रांधून वाढण्याजोगें कोठींत कांहीं आहे कीं नाहीं तें शोधशोधून ती पाहूं लागली.

कुठेंच कांहीं नव्हतें ! धान्याचा एक कणसुद्धां कुठें आढळला नाहीं.

ती बाहेर आली. खुंटीला धरून कांहीं वेळ ती तशीच उभी राहिली त्यानंतर हातांतल्या दिव्याला फुंकर देऊन, दिवा ठेवून खिडकीचें दार उघडून ती बाहेर गेली.

काळोख मी मी म्हणत होता. जिकडे तिकडे भयंकर स्तब्धता जाणवत होती. खडेकांट्यांनीं विखुरलेली एवढीशी पायवाट असतांना सुद्धां चालतांना तिला ती जाणवली नाहीं.

बागेच्या दुसऱ्या बाजूला जंगलांत अतिशूद्राची एक झोंपडी होती, त्या रोखानें ती चालली होती. विराज एकदम त्याच्या अंगणांत जाऊन हजर झाली. तिनें हांक मारली—" तुळशी—"

तिची हांक ऐकून तुळशी दिवा हातांत घेऊन बाहेर आला. अशा अवेळीं

ती आलेली पाहून आश्चर्यानें थक्क होऊन तो म्हणाला, "असल्या या काळोखांतून तुम्ही इकडे कुणीकडे माईजी ?"

विराज म्हणाली, "थोडे तांदूळ असले तर दे."

"तांदूळ देऊं ?" असें म्हणून तो वेड्यासारखा पहात राहिला. या विलक्षण मागणीचा अर्थ त्याला कळेना.

त्याच्या तोंडाकडे पहात विराज काकुळतीला येऊन म्हणाली, "पहातो आहेस काय तुळशी ? जरा लौकर दे ना !"

चार दोन प्रश्न विचारून तुळशीनें तांदूळ आणून विराजच्या पदरांत ओतले. तो म्हणाला, पण हे जाडे तांदूळ तुम्हाला काय कामाचे माईजी ! तुमच्या घशाखालीं नाहीं उतरायचे हे."

विराज म्हणाली, "कांहीं नाहीं—चालतील."

दिवा घेऊन बरोबर येतों असें तुळशी म्हणत होता, पण विराज त्याला नकार देऊन म्हणाली, "कांहीं नको. तूं एकटा कसा परत येशील मग ?—" असें म्हणत पहातां पहातां ती त्या गडद अंधारांत दिसेनाशी झाली.

आज अतिशूद्राच्या घरीं ती भीक मागायला गेली होती—भिक्षा पदरांत घेऊन आली होती—तरीही हा अपमान तिला तेवढासा जाणवला नाहीं. हालअपेष्टा, मान अपमान, यांची तीव्रता जाणवण्याची शक्तीच तिच्या अंगीं राहिली नव्हती.

घरीं येऊन पाहते तो नीलांबर आला होता. तीन दिवस नवरा तिच्या नजरेआड झाला होता. तो समोर दिसतांच देहांतल्या रक्ताचा प्रत्येक बिंदु उसळून उठला. देहांतली सारी शक्ति अनावार होऊन तिला त्याच्यापाशीं खेंचून ओढून नेऊं लागली.

तरीही तिचें एक पाऊल सुद्धां पुढें पडेना.

विजेच्या संयोगानें जसा लोखंडाचा लोहचुंबक होतो तसेंच झालें. नवरा जवळ येतांच एका क्षणांत तिच्या देहांतली सारी शक्ति जागी झाली. तरी देखील साऱ्या आकर्षणाचा निरोध करून शांतपणें त्याच्याकडे टक लावून पहात ती उभी राहिली होती.

एकच वेळ—एकदां—नीलांबरनें डोळे वर करून पाहिलें आणि पुनः मान खालीं घातली—त्याचवेळीं विराजला दिसून आलें, कीं त्याचे डोळे रक्तासारखे लालीलाल झाले होते. प्रेत जाळायला गेल्यावेळीं तीन दिवस तो सारखा गांजा पीत होता अशी तिची खात्री झाली.

चार दोन मिनिटें ती तशीच पहात राहिली होती. नंतर जवळ येऊन तिनें विचारलें, " कांहीं खाल्लें नाहीं ना ? "

नीलांबर म्हणाला, " नाहीं. "

आणखी कांहीं न विचारतां विराज तशीच स्वैपाकघरांत जात होती, तोंच तिला थांबवून नीलांबर म्हणाला, " ऐक ! एवढ्या रात्रीं कुठं गेली होतीस ? "

विराज थांबली, क्षणभर घाबरटून म्हणाली, " घाटावर. "

संशयी भाषेनें नीलांबरनें विचारलें, " नाहीं— तूं घाटावर गेली नव्हतीस. "

" तर मग गेलें होतें यमाच्या घरीं—" असें म्हणून विराज स्वैपाकघरांत गेली.

घटकाभऱ्यानें भात वाढून जेव्हां ती नीलांबरला हांक मारायला आली तेव्हां तो डोळे मिटून पेंगत होता. गांजाची मात्रा फारच चढल्यामुळें त्याचें माथें गरम झालें होतें. मेंदू सुन्न झाला होता.

सरळ होऊन बसायचा प्रयत्न करीत, पूर्वींचाच प्रश्न पुनः पुनः विचारीत तो म्हणाला, " कुठं गेली होतीस ? "

भडकणारी जीभ जोरानें चावून विराज मन आवरून शांतपणें म्हणाली, " घांसभर खाऊन आधीं झोंप घ्या. उद्यां सांगेन सावकाश.

नीलांबर मान हलवीत म्हणाला, " नाहीं—आत्तां सांग—कुठं गेली होतीस ? "

त्याच्या हट्टाचा रंग पाहून तशा स्थितींत सुद्धां विराज हंसली आणि म्हणाली, " अन् नाहीं सांगितलं तर ? "

" नाहीं म्हणजे काय ? सांगितलंच पाहिजे—बोल ! "

" मी कांहींसुद्धां सांगणार नाहीं. आधीं घांसभर खा, झोंप घ्या आणि मग सांगेन काय तें. "

नीलांबरला तिचें तें हंसणें दिसलें नाहीं. दोन्ही डोळे वटारून तो पहात होता. ते डोळे आतां सुस्त दिसत नव्हते. लांडग्याची नजर त्या डोळ्यांत आली होती. तो भडकून उठला आणि ओरडला, " नाहीं—मुळींच नाहीं—केव्हांही नाहीं. आधीं सांग. नाहीं सांगितलंस तर तुझ्या हातचें पाणीसुद्धां घेणार नाहीं. "

विराज दचकली. काळसर्पानें डंख मारला असता तरीसुद्धां ती इतकी घाबरली नसती. कोलमडत कोलमडत ती चार पावलें मागें हटून पहात

होती—तोंच डळमळून खालीं पडली. पडल्या पडल्याच म्हणाली, "काय म्हटलंत ? माझ्या हातचं पाणीसुद्धां घेणार नाहीं ?"

"नाहीं—केव्हांही नाहीं—बिलकुल नाहीं—"

"कां ?"

नीलांबर किंचाळून ओरडला, "पुनः कां म्हणून विचारतेस ?"

बराच वेळ ती नवऱ्याच्या तोंडाकडे पहात राहिली. शेवटीं उसनें अवसान आणून म्हणाली, "कळलं ! आतां पुनः नाहीं विचारणार. यावेळीं कांहींच सांगायची नाहीं ! कां तें कळलं ? उद्यां शुद्धीवर याल तेव्हां तुमचं तुम्हांलाच कळेल. यावेळीं तुम्हीं तुमचे नाहीं."

निशाबाज माणूस सारें कांहीं सहन करील पण तो शुद्धीवर नाहीं म्हटल्याचें मात्र त्याला सहन होणार नाहीं. तो एकदम बेफाम झाला. संतापून बोलूं लागला, "हो. गांजा प्यायलों आहें ! हेंच ना म्हणायचं आहे तुला ? शुद्ध नाहीं मला होय ? शुद्ध जायला आज पहिल्यानंच का गांजा प्यायलोंय ? शुद्ध कुणाची गेली असेल तर तीतुझी. तूंच तुझी नाहींस !"

विराज तशीच टकमक पहात उभी राहिली होती.

नीलांबर बोलत होता, "कुणाच्या डोळ्यांत धूळ फेकूं पहातेस विराज ? माझ्या ? मी महामूर्ख म्हणून त्या दिवशीं पीतांबरचे बोल खोटे मानले. किती झालं तरी तो माझा धाकटा भाऊ—त्यानं धाकट्या भावाचं काम बजावलं. नाहींतर कुठं होतीस तें सांगायला त्यावेळीं कां कठीण गेलं असतं तुला ?—घाटावर गेलें होतें असं कां खोटं सांगितलंस ?"

विराजची नजर बदलली होती. तिचे डोळे वेड्याच्या डोळ्यासारखे गरगरूं लागले होते. तरीही मन काबूंत ठेवून ती म्हणाली, "हो ! खोटं बोललें ! कुठं गेलें होतें तें कळलं तर तुम्हाला शरमेनं मेल्यासारखं होईल—दुःख होईल—कदाचित् मग जेवणसुद्धां जायचं नाहीं—म्हणून खोटं बोललें होतें. आतां वाटतं मीं उगीच घाबरलें. तुम्हांला लज्जा नाहीं, शरम नाहीं, माणुसकीसुद्धां नाहीं अन् तुम्ही नाहीं खोटं बोललांत ? असं बनावट बोलायला पशूलासुद्धां लाज वाटली असती. पण तुम्हांला वाटली नाहीं. आजारी बायकोला घरीं टाकून कुठल्या कुणा शिष्याच्या घरीं तीन दिवस सारखे गांजाच्या चिलमीमागून चिलम्या फुंकीत होतां !—बोला ना."

नीलांबर आतां बेफाम झाला होता. 'सांगतों' असे म्हणून हाताजवळ

सांपडलेला पानाचा रिकामा डबा उचलून विराजच्या मस्तकावर रोंखून त्यानें जोरानें फेंकला.

तो डबा तिच्या कपाळावर आपटून झणझणत खालीं उघडा होऊन पडला. पहातां पहातां तिच्या डोळ्याच्या कोपऱ्यांतून खालीं ओठापर्यंत रक्ताची धार लागली.

डाव्या हातानें डोकें दाबून धरून विराज मोठ्यानें ओरडली, " मला मारलंत ? "

नीलांबरचे ओंठ थरथरत होते. तसाच तणतणत तो ओरडला, " नाहीं, मारलं नाहीं !—दूर हो माझ्यासमोरून ! तें काळं तोंड मला दाखवूं नकोस. दूर हो अवदसे ! "

मोठ्या कष्टानें उभी राहत विराज म्हणाली, " जातें. "

एक पाऊल तिनें पुढं टाकलें—पण ती पुनः थांबली आणि म्हणाली, " पटेल ना हें तुम्हांला ? उद्यां जेव्हां कळेल—ताप असतांना मला मारलंत, मारून बाहेर घालवलंत—तीन दिवस तुम्ही कांहीं खाल्लं नसेल म्हणून काळोखांतून धडपडत जाऊन भीक मागून तांदूळ आणले तें कळेल—तेव्हां पटेल ना तुम्हाला ? या टाकून मग रहावेल ना तुमच्यानं ? "

रक्ताचे ओघळ पाहतांच नीलांबरचा कैफ उतरूं लागला होता. सुन्न होऊन तो तिच्याकडे पहात होता.

पदरानें तोंड पुसून घेऊन विराज म्हणाली, " गेलं एक वर्ष जावं जावं म्हणून म्हणत होतें. पण तुम्हाला असं टाकून जाणं जिवावर आलं होतं माझ्या ? माझ्याकडे पहा—चांगले डोळे उघडून पहा. किती थकलें आहें तें पहा. डोळ्यानं दिसत सुद्धां नाहीं चांगलंसं. एक पाऊल सुद्धां उचलवत नाहीं. मी गेलें नसतें—तुम्ही माझे पती, तुम्ही माझा संशय घेतलात—मला नांवं ठेवलींत—आतां हें तोंड तुम्हाला मी दाखवणार नाहीं. माझी मोठी वासना, कीं या तुमच्या पायां-पाशीं मरावं—मोठ्यांतली मोठी इच्छा होती ती माझी ! तो लोभ आवरणं कठीण जात होतं—आज त्या लोभावर पाणी सोडलं !—" असें म्हणून कपाळ पुशीत उघड्या दरवाजांतून ती बाहेर गेली आणि बागेच्या वाटेनें जात जात काळोखांत दिसेनाशीं झाली.

नीलांबर बोलण्याचा प्रयत्न करीत होता पण त्याच्या तोंडांतून शब्द बाहेर

फुटत नव्हता. तिच्या मागून धावत जावें असें त्याला वाटत होतें पण पाऊल उचलत नव्हतें.

कमल्या तरी जादूनें भारून टाकून त्याला दगड बनवून विराज अदृश्य झाली होती!

सरस्वती नदीकडे यावेळीं कुणी पाहिलें असतें तर तो घाबरून गेला असता. वैशाखांत रोडावलेला तिच्या पाण्याचा ओघ आज श्रावणाच्या शेवटच्या दिवसांत बेफाम झोतानें फेंसाळला होता. दुथडी भरून चालला होता.

एके दिवशीं वसंतऋतूंतल्या प्रभातकाळीं तीं वहिणभावंडें मोठ्या प्रेमानें ज्या खडकावर बसून राहिलीं होतीं, त्याच खडकावर त्या भयंकर काळोख्या रात्रीं आज विराज कोणत्या भावनेनें येऊन कांपत कांपत उभी राहिली होती?

खालीं उफाळलेलें पाणी घाटाच्या तटबंदीला धक्के देत देत मागें पुढें गिरक्या घालीत होतें. तिनें एकदां तिकडे झुकून पाहिलें—पुनः समोर पाहिलें—पायाखालीं तो काळा खडक—माथ्यावर ढगांनीं झांकळलेलें काळें आकाश—समोर काळाकुट्ट पाण्याचा झोत—चारी बाजूंनीं वेढून टाकणारी काळीकुट्ट भयंकर रात्र—ती भयंकर काळी स्तब्धता—आणि त्याच वेळीं हृदयाच्या अंतर्भागांत जागी झालेली या सर्वांपेक्षांही काळीकुट्ट अशी आत्महत्त्येची प्रवृत्ति!—

ती खालीं बसली आणि अंगावरच्या पदरानें आपले हात पाय जखडून बांधूं लागली.

## १२

पहांटे आकाश भरून आलें होतें. उघड्या दरवाजाच्या चौकटीवर डोकें टेंकून नीलांबर केव्हांतरी झोंपी गेला होता. तितक्यांत झोंपेंतच त्याच्या कानीं शब्द आले, "कोण आहे? विराजवहिनी?"

नीलांबर धडपडून उठून बसला. पावसाळयाच्या मेघांनीं झांकलेल्या प्रभात-काळीं श्रीकृष्णाचें नांव ऐकून राधा अशीच केव्हां तरी उठून बसली असेल.

डोळे पुशीत पुशीत तो बाहेर आला. अंगणांत तुळशी उभा राहून हांक मारीत होता.

काल सारी रात्र जंगलोंजंगलीं हिंडत, प्रत्येक झाडाखालीं पहात पहात, आंसवें गाळीत निराश होऊन घरीं आल्यानंतर घटकाभऱ्यापूर्वीं नीलांबर दारवठ्यावर येऊन पडला होता. त्यानंतर केव्हां डोळा लागला तें त्याला कळलें नाहीं.

तुळशीनं विचारलें, " वहिनी कुठंय् बाबू ? "

हतबुद्धासारखा त्याच्याकडे पहात नीलांबर म्हणाला, " मग हांक मारीत होतास कुणाला रे तूं ? "

तुळशी म्हणाला, " वहिनीला हांक मारीत होतों मी बाबू. काल एक पार रात्रीं—सामसूम होतं जिकडेतिकडे—भर काळोखांतून वहिनी माझ्या घरीं आली आणि जाडे तांदूळ मागून घेऊन गेली ! सकाळींच दार उघडं दिसलं म्हणून चौकशी करायला आलों—म्हटलं तांदूळ कामीं लागले का विचारावं. "

नीलांबरच्या मनांत आतां स्वच्छ प्रकाश पडला—पण तो कांहींच बोलला नाहीं.

तुळशी म्हणाला, " तर मग या भल्यापहांटे खिडकीचा दरवाजा उघडला कुणी ? वहिनी घाटावर गेली आहे वाटतं ?—" असें बोलून तो निघून गेला.

नदीच्या कांठाकांठावरून, प्रत्येक खांच खळग्यांतून, प्रत्येक वांकणावरून, प्रत्येक झाडझुडपाआड तिचा शोध करीत, स्नान केल्याशिवाय, जेवल्याशिवाय, सारा दिवस नीलांबर वणवणत होता. थकवा येऊन शेवटीं तो एका जागीं बसला आणि स्वतःशींच म्हणाला, ' हें कसलं वेड बसलं आहे माझ्या मानगुटीला ? सारा दिवस मी कांहीं खाल्लं नाहीं तें अजून सुद्धां तिच्या ध्यानीं आलं नसेल का ? एवढं ध्यानीं आल्यावर सुद्धां ती केव्हां कुठं एक क्षणभर तरी बसून राहील का ? मग हा असा वेड्यासारखा सकाळपासून मी कां फिरतों आहें ? '

सारी परिस्थिती त्याच्या नजरेसमोर इतकी स्पष्टपणें उभी राहिली, कीं त्याच्या अंतरांतली काळजी एकदम साफ धुऊन गेली. चिखल तुडवीत, शेताडींतून नाले-पार होत, तो धापा टाकीत घराकडे पळत सुटला.

दिवस मावळत आला होता. पश्चिमेच्या आकाशांत मेघाच्या भेगेंतून एक क्षणभरच सूर्यानं आपलं लाल तोंड बाहेर दाखवलें.

तो घरांत आला तो तडक स्वैंपाकघरांत येऊन उभा राहिला.

तिथं जमिनीवर पाट मांडला होता. काल रात्रीं वाढलेला भात वाळून जाऊ

होता. उंदीर इकडेतिकडे धावपळ करीत होते.

काल काळोखांत त्याला नीटसें कळलें नव्हतें. आतां भाताची दशा पाहिल्यावर त्याला कळून चुकलें—तुळशीच्या घरचे मोठे तांदूळ ते हेच! नवऱ्यासाठीं उपासपोटीं, अंगांत ताप असतांना, कांपत, थरथरत, काळोखांतून लपतछपत, हेच तांदूळ तिनें भीक मागून आणले होते. याच तांदळापायीं तिला मार खावा लागला होता—शिव्यागाळी खात, लाजेशरमेनें चूरमार होत, भरल्या पावसाळ्या रात्रीं तिला घर टाकून जावें लागलें होतें.

नीलांबर तिथेंच मट्कन् खालीं बसला. दोन्ही हातांनीं तोंड झांकून टाहो फोडून बायकांसारखा रडूं लागला. त्याला वाटलें, ‘ अजूनही आली नाहीं— आतां यानंतर कसली येते ? ’ तिला तो ओळखत होता. ती केवढी मानी होती! प्राण गेला तरी आसऱ्यासाठीं दुसऱ्याच्या घरीं जाऊन आपलें व्यंग तिनें कधींच उघडें केलें नसतें हें त्याला पूर्णपणें माहीत होतें. म्हणूनच त्याच्या हृदयांत इतक्या लौकर एवढा हाहाःकार उठला. तो एकदम कोसळून पडला. दोन्ही हात पसरून मोठमोठ्यानें पुनः पुनः म्हणूं लागला, ‘ नाहीं विराज, आतां हें सहन होत नाहीं! कुठून असशील तिथून ये! ’

संध्याकाळ झाली पण घरांत कुणी शिरलें नाहीं. रडून रडून त्याचे डोळे सुजले पण कुणी येऊन ते पुसले नाहींत. दोन दिवसांचा उपाशीं पण जेवायला येण्यासाठीं कुणी हांक मारली नाहीं.

बाहेर पावसाची झोड उठली होती. काळ्याकुट्ट काळोखाचें आवरण फोडून विजेची झळक त्याच्या झांकल्या डोळ्यांच्या आंत सुद्धां चमकून गेली. प्रचंड वादळाची वार्ता तिनें त्याला कळवली तरीही तो उठला नाहीं. तरीही त्यानें डोळे उघडले नाहींत. सारखा तोंड दाबून मुस्कारत तो तसाच पडून राहिला.

झोंपमोड झाली त्यावेळीं त्याला दिसून आलें, कीं उजाडलें होतें. बाहेर कसली तरी गडबड ऐकूं आली म्हणून तो धांवतच बाहेर आला. पहातो तों बाहेर बैलगाडी उभी होती. घाबऱ्या-घुबऱ्या तो गाडीजवळ आला—तोंच पदर पुढें ओढून मोहिनी गाडींतून खालीं उतरली. वडील भावाकडे वांकड्या नजरेनें पहात पीतांबर दुसऱ्या बाजूकडे वळून निघून गेला.

समोर येऊन मोहिनीनें त्याला नमस्कार केला. आशीर्वाद द्यायला तोंड

उघडायचा प्रयत्न करतांना तो एकदम ओक्साबोक्शीं रडूं लागला. आश्चर्यचकित झालेल्या मोहिनीनें मान वर करून त्याच्याकडे पाहिलें, तोंच तो धांवत पळत कुठल्याकुठें निघून गेला.

उभ्या आयुष्यांत मोहिनीनें आज पहिल्यानेंच नवऱ्याच्या मर्जीविरुद्ध वागायला सुरवात केली. आसवांनीं भरलेले, चोळून चोळून लाल झालेले डोळे नवऱ्याकडे रोखून ती म्हणाली, "तुमचं काळीज काय दगडानं घडवलंय? हालअपेष्टा काढीत शेवटीं जाऊबाईनीं जीव दिला तरीसुद्धां अजून आपण दुरावून राहायचं का? वाटलं तर तुम्ही रहा, पण आजपासून मी या घरच्या कामाला लागणार—"

पीतांबर चमकून म्हणाला, "म्हणजेच काय?"

तुळशीकडून जी जी कांहीं हकीकत तिला कळली होती आणि त्या हकीकतीच्या अनुरोधानें तिनें जे जे अंदाज स्वतः बांधले होते, ते सारे मोहिनीनें रडत रडत नवऱ्याला सांगितले.

सहजासहजीं कोणत्याही गोष्टीवर विश्वास ठेवणें पीतांबरला शक्य नव्हतें— तो त्याचा स्वभावच नव्हता. तो म्हणाला, "प्रेत नसतं का सांपडलं?"

डोळे पुसून मोहिनी म्हणाली, "कदाचित् नाहीं सांपडणार. नदीच्या प्रवाहांत वाहून गेलं असेल कुठं तरी. आई गंगेनं सतीलक्ष्मीचा देह उराशीं कवटाळून नेला असेल कुठं तरी. तसं पाहिलं तर कोण गेलं आहे शोधायला? कोण गेलं आहे पत्ता लावीत फिरत?"

खरें वाटलें नाहीं तरीही पीतांबर शेवटीं म्हणाला, "ठीक आहे. मी तपास करतों.—" थोडा विचार करून तो पुनः म्हणाला, "मामाच्या घरीं तर गेली नसेल वहिनी?"

निश्चयपूर्वक वाणीनें मोहिनी म्हणाली, "मुळींच नाहीं. जाऊबाई किती मानी आहे याची तुम्हाला कल्पना नाहीं. ती कुठंच जायची नाहीं—नदींतच जीव दिला तिनं."

"बरं बरं. तोच तपास करतों आतां—" असें म्हणून पीतांबर घराबाहेर पडला. आज पहिल्यानेंच वहिनीसाठीं त्याचा जीव तळमळून उठला. रयतेपैकीं एका माणसाला गांठून त्यानें त्याला विराजच्या मामाच्या घरीं पाठवलें. पहिल्यानेंच हें पुण्यकर्म त्याच्या हातून घडलें.

बायकोला हांक मारून तो म्हणाला, "यदूला बोलावून हा कूड काढून

फेंकून द्यायला सांग. आतां तुला वाटेल तें कर. दादाच्या तोंडाकडे पाहायचा मला धीर होत नाहीं—" असें म्हणून एक गुळाचा खडा तोंडांत टाकून, दप्तर बगलेला मारून तो आपल्या कामावर निघून गेला.

चार पांच दिवसांच्या गैरहजेरींत त्याचें बरेंच नुकसान झालें होतें.

डोळे पुशीत पुशीत मोहिनी घरकाम करीत होती. काम करतां करतां ती आपल्याशींच म्हणत होती, 'ज्या तोंडाकडे पहायचा धीर होत नाहीं म्हणून हे म्हणाले, तें तोंड असं झालं आहे तरी काय ?'

चंडीमंडपाच्या मध्यभागीं नीलांबर डोळे झांकून स्तब्ध बसून राहिला होता. समोरच्या भिंतीला राधाकृष्णाचें चित्र टांगलेलें होतें. जागृत चित्र होतें तें. आगगाडी नव्हती त्यावेळीं त्याच्या आजोबानें पायीं प्रवास करीत वृंदावनक्षेत्रांतून तें चित्र आणलें होतें. त्याचा आजोबा महान वैष्णव होता. चित्रांतल्या मूर्ति माणसाच्या वाणीनें त्याच्या बरोबर बोलत, असें नीलांबरनें आपल्या आईच्या तोंडून पुष्कळ वेळां ऐकलें होतें. त्याच्या हिशेबीं देवदेवता म्हणजे भ्रमांतली भूल नव्हती. तशीच काळीज फोडून हांक मारली तर त्या येऊन समोर उभ्या राहातात, बोलतात, असा त्याचा भरंवसा होता.

यापूर्वी केव्हां केव्हां हळूच या चित्रासमोर उभें राहून किती तरी वेळ त्यानें तें बोलकें करायचा प्रयत्न केला होता; पण तो प्रयत्न निष्फळ झाला होता. स्वतःच्या अंगीं सामर्थ्य नसल्यामुळें असें घडून येत होतें, असा संशयसुद्धां कधीं त्याच्या मनांत आला नाहीं. चित्रांतल्या मूर्ति बोलतात या गोष्टीवर त्याचा विश्वास होता.

त्याला लिहितां वाचतां येत नव्हतें. थोडीशी अक्षरओळख झाली होती. विराजच्या सहवासांत तो रामायण महाभारत थोडथोडें वाचायला शिकला होता. तसेंच एकाददुसरें लहानसें पत्रही त्याला लिहितां येत होतें. शास्त्र आणि धर्मग्रंथ त्याला अपरिचित होते. ईश्वरासंबंधीची त्याची कल्पना म्हणूनच सर्वस्वीं स्वतंत्र-दृष्टीची होती. या बाबतींत कुणाचाही युक्तिवाद त्याला पटत नसे. लहानपणीं या बाबतींत वादविवाद करतांना केव्हां पीतांबरबरोबर, तर केव्हां विराजबरोबर सुद्धां त्यानें मारामारी केली होती.

विराज त्याच्यापेक्षां चार वर्षांनीं लहान होती ही गोष्ट त्याच्या हिशेबीं नव्हती. त्याच्या हातचा मार मिळाल्यामुळें विराजनें एकदां त्याच्या पोटाचा

चावा घेऊन रक्त काढलें होतें. त्या दोघांना सोडवून विराजच्या सासूनें त्यावेळीं तिला बजावून सांगितलें होतें, ' नाहीं बरं मुली, नवरा म्हणजे वडील माणूस— त्याचा असा चावा घ्यायचा नाहीं ! '

विराज रडत रडत म्हणाली होती, ' पण आधीं मला मारलं कां त्यांनीं ? '

विराजच्या अंगावर केव्हांही हात टाकणार नाहीं अशी शपथ तिनें त्यावेळीं त्याच्याकडून घेववली होती. त्यावेळीं तो चौदा वर्षांचा होता. आतां तो तिशी-जवळ आला होता. मातृभक्त नीलांबरनें त्या दिवसापर्यंत आईची ती आज्ञा केव्हांच उल्लंघन केली नव्हती.

आज बसल्या बसल्या ती पूर्वीची सारी विसरलेली हकीकत पुनः त्याच्या समोर उभी राहिली. पहिल्यानें त्यानें आईची क्षमा मागितली. त्यानंतर जागृत देवतेच्या मूर्तीसमोर बालबोलानें तो आपलं अंतःकरण उघडें करीत म्हणाला, " देवा, तूं अंतर्यामी आहेस. तुला सारं कांहीं समोरासमोर दिसतं आहे. तिच्या हातून एकसुद्धां अपराध झाला नाहीं. सारं पाप माझ्या माथीं लादून तिला स्वर्गाचा मार्ग मोकळा कर. इथं तिनें अनेक हालअपेष्टा भोगल्या. आतां तरी तिला दुःख देऊं नकोस ! "

त्याच्या झांकल्या डोळ्याच्या कोंपऱ्यांतून आंसवांची झरणी लागली होती. एकदम त्याचा ध्यानभंग झाला.

" बाबा—"

आश्चर्यचकीत होऊन नीलांबरनें पाहिलें, मोहिनी जवळच बसली होती. माथ्यावरचा पदर तिनें फारसा पुढें ओढला नव्हता. ती अगदीं स्वाभाविक वाणीनं म्हणाली, " मी मुलगी आहें आपली. आतां आंत या बाबा. स्नान करून दोन घांस खाऊन जा. "

नीलांबर पहिल्यानें वेड्यासारखा पहात राहिला होता. किती युगेंपर्यंत त्याला कुणी जेवायला येण्यासाठीं हांक मारली नव्हती.

मोहिनी पुनः म्हणाली, " जेवण तयार आहे बाबा—"

आतां कुठें त्याच्या कानीं ते शब्द गेले. त्याचें सर्वांग थरारून उठलें. जमिनीवर अंग टाकून तो रडत रडत म्हणाला, " आतां सारं जेवण संपलं पोरी ! "

गांवच्या साऱ्या लोकांना ही हकीकत कळली. सर्वांची खात्री झाली, कीं विराजवहिनीनें पाण्यांत जीव दिला. धूर्त पीतांबरची मात्र खात्री झाली नव्हती.

त्याला वाटत होतें—नदीला एवढीं हीं वळणें, एवढीं झाडेंझुडपें, कुठें ना कुठें तरी अडकून राहीलच राहील.

होडींतून नदीच्या किनाऱ्या किनाऱ्यानें त्यानें सर्वत्र तपास केला. रानावनांतून माणसें पाठवून खबर काढायचा प्रयत्न केला. कुठें प्रेत लागल्याचें चिह्नसुद्धां दिसून आलें नाहीं. तेव्हां त्याची पूर्ण खात्री झाली, कीं वहिनीनें कांहीं केलें असो पण नदींत जीव दिला नाहीं खास.

कांहीं वेळापूर्वी त्याच्या मनांत शंका आली होती. पण ती शंका त्याच्या अंत:करणाचा चांगलाच ठाव घेत होती. पण ती कुणापाशींही बोलून दाखवण्याचा धीर त्याला होत नव्हता. मोहिनीला बोलून दाखवावें म्हणून तो सरसावला होता. पण जीभ चावून कानांत बोटें घालून ती मागें हटली आणि म्हणाली, "—तर मग देवदैवतं सारीं खोटीं— दिवस खोटा, रात्र खोटी—" भिंतीवर टांगलेल्या अन्नपूर्णेच्या चित्राकडे पाहून ती म्हणाली, "—जाऊबाई म्हणजे हिचा अवतार होता. कुणी म्हणो वा न म्हणो, माझी खात्री आहे ! " असें म्हणून ती निघून गेली.

ते उद्गार ऐकून पीतांबर रागावला नाहीं. आतां तो पार बदलून गेला होता. आतां मोहिनीनें दीराबरोबर बोलायला सुरुवात केली होती.

ताट वाढून ती आडोशाला बसून बोलत होती. हळूहळू प्रश्न करुन सारी हकीकत विचारुन घेत होती. साऱ्या माणसांत एकट्या तिलाच नीलांबरचें अंतरंग कळून आलें होतें. त्याच्या हृदयावर केवढा मोठा आघात झाला होता याची कल्पना एकट्या तिलाच आली होती.

नीलांबर म्हणाला, " पोरी, माझ्या हातून केवढाही घोर अपराध झाला असो पण तो मी कळूनसवरुन केलेला नाहीं. पण एवढी माया तोडून ती अशी कशी निघून गेली ? सहन करणं अशक्य झालं म्हणून का ती निघून गेली पोरी ? "

मोहिनीला सर्व हकिकत माहित होती. घर सोडून जाण्याचा विचार करुन आपल्या नवऱ्याचा भार विराजनें तिच्यावर टाकल्याची हकिकत, मनांत आलें असतें तर, तिला सांगतां असती. पण ती कांहींच बोलली नाहीं.

पीतांबरनें मोहिनीला विचारलें, " तूं दादाबरोबर बोलतेस ? "

मोहिनीनें उत्तर दिलें, " बाबा म्हणतें, म्हणून बोलतें. "

पीतांबर हंसून म्हणाला, " पण लोकांनीं ऐकलं तर ते निंदा करतील ना ? "

रागाला येऊन मोहिनी म्हणाली, " लोकांनीं काय हवं तें म्हटलं तरी मला पर्वा नाहीं त्याची. काय करणार आहेत ते ? त्यांचं काम ते करतील—माझं काम मी करीन. या प्रसंगांतून थोरल्या भाऊजींना उभं ठेवतां आलं कीं माझं काम झालं. मग लोकांच्या निंदेचा पर्वत मी सहज माथीं वाहीन—" असें म्हणून ती आपल्या कामाला लागली.

## १३

पंधरा महिने होऊन गेले. येत्या नवरात्राच्या उत्सवानिमित्त जिकडे तिकडे आनंद ओसंडून राहिला होता. उल्हासानें जळीं, स्थळीं, आकाशीं, पाताळीं, आनंदाचें वातावरण दुमदुमत होतें.

तिसऱ्या प्रहरीं नीलांबर एक कांबळें टाकून स्वस्थ बसून राहिला होता. देह अत्यंत कृश झालेला, चेहरा फिकट झालेला, डोक्याच्या केसांच्या लहान लहान जटा झालेल्या, नजरेंत वैराग्य आणि विश्वव्यापी करुणा—असा तो निष्क्रीय बसून राहिलाः होता. समोर उघडून ठेवलेली महाभारताची पोथी बंद करून विधवा भावजयीला उद्देशून तो म्हणाला, " छोटीकडच्या मंडळीचं आज बहुधा येणं होत नाहीं ! "

पांढरं पातळ नेसून मोहिनी जवळच बसली होती. तिच्या अंगावर एकही दागिना नव्हता. हा वेळपर्यंत ती महाभारत ऐकत होती. बाहेर डोकावून पाहून ती म्हणाली, " नाहीं बाबा, अजून वेळ आहे. अजूनही येतील. "

कर्दनकाळ सासऱ्याच्या मृत्युमुळें छोटी आतां स्वतंत्र झाली होती. साऱ्या लव्याजम्यासह ती नवऱ्याला घेऊन माहेरीं येणार होती आणि पूजेच्या मुदतींत तिथेंच राहणार होती. तिच्याकडून तसें पत्र आलें होतें. अजूनपर्यंत इकडली हकीकत तिला कांहींच कळली नव्हती. बालपणांत तिची आई होऊन राहिलेली वहिनी नाहीं—सहा महिन्यापूर्वीं सर्पदंशानें पीतांबर मरण पावला—वगैरे हकीकत तिला कळली नव्हती.

एक सुस्कारा सोडून नीलांबर म्हणाला, " मला वाटतं, ती न आलेलीच बरी. एकदम एवढ्या दुःखाच्या बातम्या तिला सहन व्हायच्या नाहींत. "

कोरड्या पडलेल्या त्याच्या डोळ्यांना आज आवडत्या छोट्या बहिणीच्या आठवणीनं इतक्या दिवसानंतर ओलावा आला.

सर्पदंश होऊन पीतांबरला घरीं आणला त्यावेळीं त्याचे दोन्ही पाय घट्ट धरून तो म्हणूं लागला होता, " आतां औषधपाणी कांहींच करूं नका दादा. तुमच्या पायाचं तीर्थ माझ्या मुखांत घाला. तेवढ्यानं जगलों नाहीं तर मला मुळीं जगायचंच नाहीं. " असें म्हणून सर्व प्रकारचीं औषधें, मंत्र, झाडफुंक, सक्तीनें बंद करायला लावून तो दादाच्या पायाजवळ डोकें घांशीत पडला होता. विषाच्या वेदनांतून सुटका होईपर्यंत—मृत्यूच्या शेवटच्या क्षणापर्यंत त्यानें त्याचे पाय सोडले नव्हते, त्या दिवशीं शेवटचें रडून घेऊन नीलांबर स्वस्थ झाला होता. आज पुनः त्या डोळ्यांना पाणी आलें.

पतिव्रता साध्वी मोहिनी, मान वळवून स्वतःच्या डोळ्यांतलीं आंसवें पुसून घेऊन स्वस्थ राहिली होती. नीलांबर शांतपणें बोलत होता, " त्यासाठीं मी एवढा रडत नाहीं पोरी. माझ्या पीतांबराप्रमाणेंच विराजलासुद्धां देव घेऊन गेला असता तर आजचा दिवस सुखाचा वाटला असता. तसं कांहीं घडलं नाहीं. छोटी आतां मोठी झाली आहे, तिला आतां सारं कांहीं कळूं लागलं आहे, आई होऊन राहिलेल्या वहिनीच्या कलंकाची कथा कळली तर तिचं काळीज फुटून नाहीं का जायचं ? तोंड वर करून पहावेल का तिच्याच्यानं ? "

मनांतल्या टोंचण्या असह्य होऊन गेल्या. दोन महिन्यापूर्वीं सुंद्रीनं नीलांबरकडे सारी हकीकत ओकून टाकली होती.

त्या रात्रीं विराज गेली नव्हती. जमीदार राजेंद्राबरोबर ती निघून गेली होती. नीलांबरच्या मनींच्या यातना पाहणें तिला अशक्य झालें होतें. ही हकीकत कळल्यावर संतापाच्या भरांत सारें दुःख तो विसरून जाईल असें तिला वाटलें होतें. सुंद्रीनें सांगितलेली ही हकीकत नीलांबर त्यावेळीं मोहिनीकडे बोलून गेला होता.

ती सारी हकीकत आठवून मोहिनी कांहीं वेळ स्वस्थ बसून राहिली होती. नंतर ती हळूच म्हणाली, " वन्संना हें कांहीं कळवायची जरुरी नाहीं. "

" हें लपवून कसं ठेवूं पोरी ? वहिनीचं कांय झालं म्हणून विचारलं तर काय उत्तर देऊं ? "

मोहिनी म्हणाली, " जाऊबाईनीं नदींत जीव दिला असंच सारीं म्हणताहेत—तसंच सांगायचं. "

नकार देत नीलांबर म्हणाला, " नाहीं पोरी, तें होणं नाहीं. पापावर झांकण घातलं तर ते अधिक वाढतं, असं म्हणतात. आम्ही तिचीं जिव्हाळयाचीं

माणसं. तिच्या पापाचं माप आम्ही तरी आणखी वाढवतां कामा नये—" असें म्हणून तो उगीच थोडेंसें हंसला. त्या हंसण्यांत अंतरींच्या केवढ्या यातना, क्षमेचा केवढा मोठेपणा होता तो मोहिनीलाच कळून आला.

थोड्या वेळानं मोठ्या संकोचानं मोहिनी हळूच म्हणाली, " कदाचित तें सारंच खोटं असेल बाबा."

" सारंच खोटं काय पोरी ? तुझ्या जाऊबाईची गोष्ट होय ? "

मान खालीं घालून मोहिनी उगीच राहिली.

नीलांबर म्हणाला, " सारं खरं आहे पोरी, सारं खरं आहे ! तुला माहीत आहे ना ? संताप आला, कीं त्या पागल बाईला भान रहात नसे. एवढीशी होती तेव्हांही तशीच, मोठी झाली तेव्हांही तशीच. त्यांतून माझ्याकरवी जे अत्याचार झाले, मी जी मानहानी केली, ती सहन करणं खुद्द देवाला देखील कठीण गेलं असतं. ती तर एक माणूस !—" डोळ्यांत आलेला आसवाचा एक थेंब बोटानं पुसून घेऊन नीलांबर म्हणाला, "—आठवण आली कीं काळीज फाटून जातं पोरी,—विचारीनं तीन दिवस कांहीं खाल्लं नव्हतं. आंगावर ताप घेऊन, कांपत धडपडत माझ्यासाठीं मूठभर तांदळाची भीक मागायला गेली होती. त्या गुन्ह्यासाठीं मी—" त्याच्या तोंडांतून शब्द फुटेना. रडण्याचा आवेग दाबण्यासाठीं धोतराचा बोळा तोंडांत घेऊन तो फुलून फुलून स्फुंदूं लागला. मोहिनी सुद्धां तशीच रडत होती. तिच्याही तोंडांतून शब्द बाहेर फुटत नव्हता. कितीतरी क्षण असेच निघून गेले.

कांहीं वेळानं नीलांबर थोडासा भानावर आला आणि डोळे पुसून म्हणाला, " तुला पुष्कळ गोष्टी माहीत आहेत. तरीपण मी म्हणतों तें ऐक. काय झालं कोण जाणे—त्या रात्रीं ती बेभान झाली आणि सुंद्रीच्या घरीं गेली. त्यानंतर— अरेरे ! पैशाच्या लोभानं सुंद्रीनं त्याच रात्रीं त्या पागल झालेल्या बायकोला राजेंद्रबाबूच्या नौकेवर नेऊन पोंचवलें—"

त्याचें भाषण पुरें न होऊं देतां सारी लाजशरम विसरून मोहिनी मोठ्यानं ओरडून म्हणाली, " सारं खोटं—बाबा, सारं खोटं ! जाऊबाईच्या देहांत प्राण असेपर्यंत ती असलं ओंगळ काम कधींच करती ना ! सुंद्रीचं तोंडसुद्धां ती पहात नसे. "

नीलांबर शांतपणें म्हणाला, " तेंही माहीत आहे मला. कदाचित् तूं म्हणतेस तेंही खरं असेल पोरी. तिच्या देहांत त्राणच राहिलं नव्हतं.

चांगली शुद्ध जायच्या पूर्वीच तिनं तें मला देऊन टाकलं होतं—ते प्राण ती कांहीं बरोबर घेऊन गेली नव्हती—अजूनही आहेत ते माझ्यापाशीं.—" असें म्हणून डोळे झांकून तो आपल्या हृदयाच्या सखोल भागाचा ठाव घेऊन पाहूं लागला.

त्या शांत आणि गंभीर चेहऱ्याकडे पहात मोहिनी मुग्ध होऊन बसली होती. द्वेष, मत्सर, संतापाची एवढीसुद्धां छाया त्या चेहऱ्यावर दिसत नव्हती. केवळ अपरिसीम वेदना आणि क्षमाशीलतेच्या अनिर्वचनीय महिमेनें तो चेहरा उजळून उठला होता.

पदर पसरून त्याला प्रणाम करून मोहिनी मुकाट्यानं तिथून उठून निघून गेली.

सांजवात लावतांना ती आपल्याशींच म्हणाली, "जाऊबाईनींच खरं ओळखलं होतं. म्हणूनच एक दिवससुद्धां भाऊजींना टाकून ती कधीं रहात नव्हती."

चार वर्षांच्या मुदतीनंतर छोटी माहेरीं आली होती—आणि आली तीही बऱ्या माणसासारखी आली होती. तिचा नवरा, सहा महिन्यांचा तिचा मुलगा, पांच सहा दासी आणि कितीतरी सामानसुमान, यांनीं सर्व घर भरून गेलें होतें.

स्टेशनवर घरचा गडी यदू भेटला. त्याच्याकडून खबर कळली तेव्हांपासूनच तिनं रडायला सुरवात केली होती. मोठ्यानं टाहो फोडून रडत, प्रहर रात्रीच्या वेळीं सारें गांव जागवून उठवीत, ती घरांत शिरली आणि दादाच्या कुशींत मान खुपसून फुलून फुलून रडूं लागली.

त्यारात्रीं ती पाण्याला सुद्धां शिवली नाहीं. दादालाही तिनं सोडलें नाहीं, तोंड झांकून घेऊन एक एक करून सारी हकीकत ती मुकाट्यानं ऐकून घेत होती. पूर्वीपासून वहिनीला ती भीत असे. तिच्याशीं संकोचानं वागत असे. पण दादा तिला कधींच मोठा वाटला नव्हता. दादाजवळ तिनं संकोच धरला नव्हता. जो कांहीं हट्ट, लाडिकपणा करायचा तो सारा दादाजवळ.

पहिल्यानंच सासरीं जायच्यावेळीं वहिनीच्या तोंडचे कडवे शब्द ऐकून ती दादाच्या गळीं पडून रडली होती. ज्या या तिच्या दादाला आजवर तिनं छळलें, असल्या थकल्या भागल्या जीवाला पागल करून सोडलें, त्या वहिनीचा तिला म्हणूनच जो संताप आला, त्याला सीमा नव्हती.

दादाला झालेल्या या यातनांपुढें स्वतःला झालेल्या त्रासाची तिला मुळींच

पर्वा वाटत नव्हती. सासरच्या माणसांचा तिला तिटकारा आला होता. सर्पदंशानं पीतांबर मेला याचं दुःख तिला जाणवलं नाहीं. त्याच्या दुर्दैवी विधवेकडे तिनं एकदां नजर वळवूनसुद्धां पाहिलें नाहीं.

दोन दिवसांनीं तिनें आपल्या नवऱ्याला बोलावून सांगितलें, " दादाला घेऊन मी पश्चिमयात्रेला जातें. हें सारं लटांबर घेऊन तुम्ही घरीं जा. वाटलं तर या माझ्याबरोबर. "

बरीच घासाघीस केल्यानंतर यतीननें ठरवून टाकलें. तिची समजूत घालणें सोपें नाहीं अशी खात्री झाल्यामुळें सामानसुमान बांधून घेऊन तो निघून गेला.

यात्रेला जायची तयारी सुरु झाली. छोटीनं कुणाला नकळत सुंद्रीला भेटायला बोलावलं होतं पण ती आली नाहीं. बोलवायला गेलेल्या माणसाला ती म्हणाली, " कुठल्या तोंडानं तिकडे येऊं ? जें सांगायचं तें सारं मी सांगून टाकलं आहे— आतां सांगण्याजोगं कांहींच नाहीं ! "

तिचं उत्तर ऐकून छोटी संतापली—तरीही दांत ओंठ खाऊन ती स्वस्थ राहिली.

छोटी आपल्याला उपेक्षेनं वागवते आहे आणि त्याहीपेक्षां आपल्या जाऊबाईला दोषी ठरवते आहे, हें पाहून मोहिनी फार दुःखी झाली. ही गोष्ट तिच्या मनाला किती लागून राहिली होती हें एक तिच्या अंतरात्म्यालाच ठाऊक !

थोरल्या जावेचं स्मरण करुन ती हात जोडून म्हणाली, " जाऊबाई, तुमच्या-खेरीज माझं अंतरंग दुसऱ्या कुणाला कळणार आहे ? कुठंही असलांत तरी क्षमा करुन मला आशीर्वाद दिलात कीं मला सारं कांहीं पावलं. "

पहिल्यापासूनच ती मोठी मोशिक होती. आज सुद्धां मुकाट्यानं ती सर्वांची सेवा करीत होती. कुणालाच कांहीं बोलत नव्हती.

दीराला वाढायचा भार आतां छोटीनं पतकरला होता, त्यामुळें अलीकडे तिथंही तिला बसावें लागत नव्हतं.

निघायच्या दिवशीं नीलांबर अत्यंत आश्चर्यचकित होऊन म्हणाला, " तूं येत नाहींस मुली ? "

मोहिनीनं नुसती नकरार्थी मान हलवली.

कडेवर मुलगा घेऊन दादाच्या जवळ येऊन छोटी ऐकत होती.

नीलांबर म्हणाला, " हें चालायचं नाहीं मुली. तूं इथं एकटीच कशी राह-

शील ? अन् राहून तरी काय होणार आहे ? चल ना. "

तशीच मान खालीं घालून मोहिनी म्हणाली, " नाहीं बाबा, मला कुठं जातां येत नाहीं. "

मोहिनीचें माहेर चांगलें सुस्थितींतलें होतें. विधवा मुलीला तिकडे घेऊन जायचा त्यांनीं पुष्कळ वेळां प्रयत्न केला पण कांहीं केल्या ती माहेरीं जायला तयार झाली नव्हती.

त्यावेळीं नीलांबरला वाटलें होतें, कीं केवळ त्याच्यासाठीं म्हणूनच ती माहेरीं जात नव्हती; पण आतां घरांतील सारीं माणसें निघून गेल्यावर ती तिथें एकटीच राहण्याचा कां आग्रह धरते याची कल्पना त्याला येईना. त्यानें विचारलें, " कुठंच जायचं नाहीं असं कां म्हणते आहेस मुली ? "

मोहिनीनें उत्तर दिलें नाहीं.

" तूं सांगितलं नाहींस तर आमचं जाणं व्हायचं नाहीं. "

मोहिनी शांतपणें म्हणाली, " आपण जा, मी इथं राहतें. "

" कां ? "

मोहिनी आणखी कांहीं वेळ उगीच राहिली होती. मनांतल्या संकोचाचा भार नाहींसा करायचा जीव तोडून प्रयत्न करीत होती. आंवढा गिळून ती अगदीं खालच्या आवाजांत म्हणाली, " कधीं जाऊबाई आल्या तर !—म्हणूनच मला इथून कुठं जातां येत नाहीं बाबा. "

नीलांबर एकाएकीं दचकला. विजेचा चमकता झोत नजरेसमोरून गेल्यावर जसा क्षणभर चोंहीकडे काळोख दिसूं लागतो तसेंच त्याला वाटलें. पण तें अगदीं क्षणभरच. तो तेवढा क्षण सांवरून घेऊन तो अगदीं केविलवाणेपणानें थोडासा हंसला आणि म्हणाला, " छेः मुली, तूंच जर अशी वेड्यासारखी बोलूं लागलीस —असा पोरकटपणा करूं लागलीस—तर मग आम्ही काय करावं ? "

मोहिनीनें एक निमिषभर डोळे मिटून आपलें अंतरंग पारखून घेतलें. दुसऱ्याच क्षणाला तिचा सारा संशय नाहींसा झाला. अत्यंत शांतपणानें ती म्हणाली, " आपण काय वाटेल तें म्हणा, पण हे चंद्रसूर्य रोज उगवताहेत तोंपर्यंत मी कुणाचेही आरोप खरे मानायची नाहीं. "

तटस्थ होऊन तीं बहीण-भावंडें हातांत हात घालून तिच्याकडे पहात राहिलीं होतीं. मोहिनी अधिकारपूर्ण वाणीनें बोलत होती, " नवऱ्याच्या पायावर मस्तक

ठेवीत मरायचा वर तिनं तुमच्याकडून मागून घेतला होता. तो वर तुम्हीं दिला. तो वर केव्हांही खोटा व्हायचा नाहीं. माझी जाऊबाई म्हणजे सतीलक्ष्मी आहे. माझी खात्री आहे, ती पुनः इथें येणारच. या देहांत प्राण असेपर्यंत तिची वाट पहात मी इथंच राहणार. मला इथून कुठं जायला सांगू नका बाबा! "—असें म्हणून, एका दमांत इतक्या गोष्टी एकदम सांगितल्याच्या श्रमानें मान खालीं घालून, ती धापा टाकीत राहिली.

नीलांबरचें मन आतां अनावर झालें. रडण्याचा उमाळा त्याच्या ओंठापर्यंत आला होता. त्याला कुठेंतरी आड जाऊन वाट फोडण्यासाठीं तो तिथून एकदम निघून गेला.

छोटीनं एकदां चोंहीकडे पाहून घेतलं. कडेवरच्या मुलाला खालीं ठेवून तिनं आज पहिल्यानेंच आपल्या विधवा भावजयीच्या गळ्याला मिठी मारून रडायला सुरवात केली. ती म्हणाली, " वहिनी आजवर मला तुझी ओळख पटली नव्हती. मला क्षमा कर वहिनी. "

खालीं वांकून मोहिनीनं छोटीच्या मुलाला उचलून हृदयाशीं धरलें आणि अनावर झालेलीं आंसवें गाळीत त्याच्या तोंडांत तोंड घालून ती स्वैपाकघरांत गेली.

## १४

विराज मरायला निघाली होती—पण ती मेली नाहीं.

त्या रात्रीं मरायचा प्रयत्न करण्याच्या घटकेच्या पूर्वी पुष्कळ दिवसाच्या हालअपेष्टांनीं थकून दुबळ्या झालेल्या तिच्या मेंदूवर परिणाम झाला. उपास आणि अपमान यांच्या असह्य आघातांनीं मरणाचा मार्ग सोडून तिचें पाऊल अगदींच वेगळ्या मार्गाकडे खेंचले गेलें.

हृदयाशीं मृत्यू कवटाळण्यासाठीं पदरानें ती आपले हातपाय बांधीत होती. त्यावेळीं आकाशांतून वीज चमकून खालीं पडली. त्या आवाजासरशीं दचकून तिनें समोर पाहिलं. विजेच्या झळझळित प्रकाशांत पैलतीरावरचा घाट, स्नानाचा घाट, आणि तो मासे धरायचा लांकडी माचा एकदम तिच्या नजरेला आला. तिनें डोळे उघडतांच तिच्या नजरेंत भरावें म्हणूनच जणूं काय तो मुकाट्यानें काळोखांत दडाला होता—खूण करून तिला हांक मारीत होता.

बेफाम होऊन विराज म्हणाली, " माझ्या हातच्या पाण्याला सुद्धां हा साधु पुरुष शिवत नाहींत—हा पापी तरी घेईल तें ! छान !

कुंभाराच्या भट्टींत जळता कोळसा जसा कडकडून आवाज देऊन राख होऊन पडतो त्याचप्रमाणें विराजच्या पेटत्या मेंदूच्या झळीनें तिचें मोलाचें अंतःकरण जळून राखरांगोळी होऊन गेलें. ती नवरा विसरली, धर्म विसरली, मरण विसरली. जीव टाकून सारखी एका नजरेनें पलीकडच्या घाटाकडे पहात राहिली.

पुनः एकदां विजेचा कडकडाट झाला. काळोख्या आकाशाचें काळीज फोडून विजेचा झोत उठला, तिची फांकलेली दृष्टि संकुचित होऊन स्वतःकडे वळली. खालीं वांकून तिनें एकदां पाण्याकडे पाहिलें, मान वळवून एकदां घराकडे नजर फेंकली, त्यानंतर हातापायाला बांधलेली गांठी हलक्या हातानें सोडवून, पाहतां पाहतां ती त्या जंगलाच्या काळोखांत दिसेनाशीं झाली.

झपाझप पावलें टाकीत असतांना सरसर खसखस करून जीवजिवाणू, साप, किरडूं, बाजूला सरकत होतीं. तिनें त्यांची पर्वा केली नाहीं. ती सुंद्रीच्या घरीं जायला निघाली होती. पंचाननबाबाच्या देवळाजवळ तिचें घर होतें. देवपूजेला जात असतांना तिनें कित्येकवेळां तें पाहिलें होतें. ती गांवची सून असली तरी लहानपणापासून सासरींच रहात असल्यामुळें गांवच्या साऱ्या वाटा आडवाटा तिला माहीत होत्या. थोड्याच वेळानें ती सुंद्रीच्या घराच्या बंद केलेल्या दरवाजाजवळ येऊन उभी राहिली.

आणखी दोन घटका निघून गेल्या. कांगाल कोळी आपली तरीची होडी घेऊन पैलतीराला निघाला होता. रात्रीं अपरात्रीं कितीतरी वेळां पैशाच्या लोभानें तो सुंद्रीला पैलतीरीं पोंचवून येत असे. आजही तो तसाच निघाला होता—मात्र आज एका ऐवजीं दोन बायका त्या होडींत मुकाट्यानें बसल्या होत्या.

काळोखांत विराजचा चेहरा त्या कोळ्याला दिसला नाहीं. दिसला असतां तरीही त्यानें तिला ओळखलें नसतें. आपल्याच घाटाकडून होडी जात असतांना दुरून काळोखांत तिला उंचीपुरी माणसाची आकृति स्पष्टपणें दिसली. ती आकृति क्षणभर थांबली असें पाहून विराजनें आपले डोळे झांकून घेतले.

सुंद्रीनें तिच्या कानाशीं लागून विचारलें, " तुला असं कुणी मारलं सुनबाई ? "

विराज चिडून म्हणाली, " माझ्या अंगावर हात टाकायचा धीर त्यांच्या-खेरीज दुसऱ्या कुणाला होईल का सुंद्री ? पुनः पुनः कशाला विचारतेस ? "

सुंद्री ओशाळून उगीच राहिली.

आणखी दोन घटकांनीं एक सुसज्जित गृहनौका नांगर उचलून चालू झाली, तेव्हां विराजनें सुंद्रीला विचारलें, " तूं येत नाहींस बरोबर ? "

" नाहीं सूनबाई, मी गांवांत नसलें तर लोक उगीच संशय घेतील. तूं जा आतां. अगदीं भिऊं नकोस. पुनः आपण भेटूं. "

यावर विराज कांहीं बोलली नाहीं. कांगाल कोळयाच्या डुबक्यांत बसून सुंद्री आपल्या घरीं जायला निघाली.

जमीदाराची ती सुंदर गृहनौका तीर सोडून विराजला घेऊन त्रिवेणी नदीच्या वाटेला निघाली.

वल्ह्यांच्या आवाजाला दाबीत वावझडीचा आवाज दुमदुमत होता.

दूर एका बाजूला बसून राजेंद्र मुकाट्यानें खालीं मान घालून दारु पीत होता. दगडाच्या पुतळीसारखी ताठ होऊन विराज झोंझावत्या पाण्याकडे पहात होती.

आज राजेंद्र खूप दारु प्याला होता. दारुच्या कैफानें त्याच्या देहांतलें रक्त मळसळून उठलें होतें. मस्तकांत दारुचा कैफ चढून तो बेफाम होत आला होता.

सप्तग्रामाची सीमा सोडून नौका निघाली त्यावेळीं बसल्या जागेवरुन उठून तो तिच्याजवळ येऊन बसला.

विराजचे कोरडे केंस तिच्या पाठीवर रुळत होते. माथ्यावरचा पदर सरकून खांद्यावर पडला होता. तिला एवढीसुद्धां शुद्ध नव्हती. कोण आलें, कोण जवळ बसलें, तें तिनें ढुंकून सुद्धां पाहिलें नाहीं.

पण राजेंद्रची ही काय दशा झाली होती ! एखाद्या भयंकर जागीं माणूस एकाएकीं एकटाच येऊन पडला म्हणजे भुताखेताच्या भयानें त्याचें काळीज जसें धडधडूं लागतें, त्याचप्रमाणें राजेंद्राच्या हृदयांत एकदम भीतीची धडकी भरली. तो नुसता पहातच राहिला. तोंड उघडून बोलायचें सामर्थ्य त्याला झालें नाहीं.

याच बाईसाठीं कां आपण एवढा जिवाचा आटापिटा केला ?

सारखीं दोन वर्षे रात्रंदिवस मनांतल्या मनांत तो तिच्या मागून हिंडत होता.

झोपेंत, जागृतींत तिचें ध्यान करीत होता. तिला एकदां डोळे भरून पहावें म्हणून तहानभूक विसरून जंगलांतल्या झाडाझुडपांआड तासचे तास तो वाट पहात उभा होता.

याला झोंपेंतून उठवून सुंद्रीनें त्याच्या कानांत सांगितलें. स्वप्नांतसुद्धां अशक्य वाटणारी गोष्ट घडून आल्याचें त्याला कळलें त्यावेळीं त्या धक्क्यानें तो सुन्न होऊन बसला. अचानक झालेल्या या लाभाचा आनंद त्याला किती वेळपर्यंत तरी जाणवला नाहीं.

समोरच नदीच्या वांकणांत दोन्ही तीरावरचीं प्रचंड वेळूंचीं बेटें, पुराणे वटवृक्ष आणि पायरीचीं झाडें, एकमेकांत मिसळलीं होती. कळकीच्या कैच्या आणि झाडांच्या डाहाळ्या ठिकठिकाणीं नदीच्या पाण्यांत येऊन भिडल्या होत्या आणि त्यांच्या सांवटीमुळें त्या भागांत गर्द काळोख पसरून राहिला होता.

या जागीं नौका येतांच राजेंद्रनें उसनें अवसान आणून बोलायचा प्रयत्न केला. बोबडा पडलेला आवाज कसाबसा आटोक्यांत आणून त्यानें बोलून टाकलें, " हें पहा—तूं—तुम्ही—आपण—आंत जाऊन बसा. झाडाच्या डाहाळ्या अंगाला लागतील ! "

मान वळवून विराजनें पाहिलें. समोरच एक लहानसा दिवा तेवत होता, त्याच्या मिणमिणत्या प्रकाशांत त्यांची नजरानजर झाली—पूर्वीं जेव्हां अशी नजरानजर झाली होती त्यावेळीं हाच दुर्जन परक्याच्या हद्दींत येऊन उभा राहिला होता. म्हणूनच त्यावेळीं त्याच्या डोळ्याला डोळा द्यायचें धैर्य तिला झालें होतें. पण आज ती त्याच्या ताब्यांत गेली होती—दारूच्या कैफानें स्वतःचें माथें बुध्द्या सुन्न करून घेऊनही तिच्या नजरेला नजर भिडवण्याचें सामर्थ्य त्याला होईना.

त्यानें मान खालीं घातली.

पण विराज मात्र पहात राहिली होती. एक परपुरुष अगदीं तिच्याजवळ बसला होता. तिच्या तोंडावर बुरखा नव्हता. डोक्यावरसुद्धां पदर राहिला नव्हता,

याच वेळीं ती नौका घनदाट झाडींतून अरुंद पाण्यांत शिरली, तेव्हां वल्हीं उचलून घेऊन होडीवाले डाहाळ्या दूर करायच्या कामाला लागले. या जागीं नदीचें पात्र अगदींच अरुंद झालेलें असल्यामुळें पाण्याचा वेग आणि ओढ अतिशय प्रखर झाली होती.

'अरे, सावध, सावध ! ' म्हणून राजेंद्रनें होडीवाल्यांना एकदां बजावलें

आणि पुनः विराजकडे वळून तिला उद्देशून म्हटलें, " हं, हं. लागेल ! आपण आंत या. " असें म्हणून तो स्वतः होडीच्या केबिनींत गेला.

भारावलेल्या मस्तकानें यंत्रासारखीं पावलें टाकीत विराज त्याच्या मागोमाग आंत गेली. तिनें आंत पाऊल टाकलें मात्र—तोंच एकाएकीं ' आई ग ऽ ' म्हणून ती किंचाळली.

ती किंचाळी ऐकून राजेंद्र दचकून मागें हटला. त्या मिणमिणत्या प्रकाशांत विराजचे दोन्ही डोळे आणि जखमेंतल्या रक्तानें भरलेल्या भागांतलें कुंकू त्याच्या नजरेला चामुंडेच्या त्रिनेत्रासारखें जळजळतें आहे, असें त्याला वाटलें.

घाबरून बोबडी वळून तो झट्कन् मागें हटून थांबला. चिखलानें बरबटलेलें थंड थंड, ओंगळवाणें किरडूं, नकळत काळोखांत माणसांच्या पायांखालीं आलें म्हणजे तो जसा एकदम उडी मारतो, त्याप्रमाणें त्याला पाहतांच शहारून विराज एकदम बाहेर पडली.

एकदां तिनें पाण्याकडे पाहिलें आणि दुसऱ्याच क्षणाला, " आई ग ! काय केलं हें मी ! " असें म्हणून त्या अथांग पाण्यांत तिनें एकदम उडी घेतली.

होडीवाले किंकाळ्या फोडूं लागले, इकडे तिकडे धांवाधांव करूं लागले. त्या धावाधावीमुळें होडी उलटण्याची भीति वाटण्यापलिकडे फारसें कांहीं निष्पन्न झालें नाहीं.

डोळ्यांत प्राण आणून सारे जण त्या काळ्याकुट्ट काळोखांतल्या पाण्यांत डोळे फाडफाडून पाहण्याचा प्रयत्न करीत होते—पण कांहीं सुद्धां दिसून आलें नाहीं.

केवळ राजेंद्र मात्र एक केंसभरही टळला नाहीं. त्याचा कैफ उतरला होता तरीही तो नुसताच उभा राहिला होता.

पाण्याच्या झोताबरोबर कांहीं वेळपर्यंत वहात जात होडी बाहेर मोठ्या पात्रांत आली तेव्हां होडीवाले वांकडें तोंड करून त्याच्याजवळ आले आणि म्हणाले, " बाबू आतां काय करायचं ? पोलिसांत खबर दिली पाहिजे का ? "

घाबरल्या नजरेनें त्यांच्या तोंडाकडे पहात फुटक्या आवाजानें राजेंद्र म्हणाला, " कां ? तुरुंगांत जायसाठीं होय ? आतां पळ गदाई, वाटेल तें करून एकदां इथून पळ काढूं. "

गदाई कोळी पुराणा माणूस. तो बाबूला ओळखत होता. सारेच ओळखत होते. भानगड कोणत्या प्रकारची आहे याचा अंदाज त्यामुळें त्यांना होताच.

आतां हें इंगित कळलें तेव्हां त्यांचे डोळे साफ उघडले. सर्वांना एकत्र करून त्यांनीं हळूच कानगोष्टी केल्या आणि वल्ह्यावर बार धरून पहातां पहातां नौका दिसेनाशी झाली.

कलकत्ता जवळ आलें तेव्हां कुठें राजेंद्राचा जीव खालीं पडला. गेल्या रात्रीं त्या मिट्ट काळोखांत समोरासमोर त्यानें जे डोळे पाहिले होते त्या डोळयांतली नजर आठवून, आज दिवसा उजेडीं, तिथून इतक्या दूर अंतर गांठलें असतांही त्याच्या अंगांत झिणझिण्या आल्या, मनांतल्या मनांत त्यानें स्वतःचे कान पिळून घेतले आणि जिवांत जीव असेपर्यंत असलें कांहीं काम करायचें नाहीं असा निश्चय केला.

त्याला वाटलें, कुणी सांगावें—कुठें काय कसली वृत्ति छपून राहिली असते नी ! त्या पागल बाईनें आपले वडिलोपार्जित प्राण डोळयांवाटे शोषून घेतले नाहींत हेंच मोठें भाग्य, असें त्याला वाटलें. आतां प्राण गेला तरी या बाजूला वळायचें नाहीं..

कुलटा बायका घेऊन आजपर्यंत त्याचा खेळ चालला होता—सती म्हणजे काय हें त्याला अजून कळलें नव्हतें. त्या कलुषित जीवनांत पहिल्यानेंच चैतन्य आलें. टाकलेली सापाची कात घेऊन खेळवतां येते पण जिवंत नाग म्हणजे जमीनदाराच्या पोराला देखील झेपणारें खेळणें नव्हे, याचा प्रत्यय त्याला आला.

## १५

त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं विराजच्या उशाशीं जी बाई बसली होती तिला विराजनें विचारलें तेव्हां तिला कळून आलें, कीं आपण हुगळीच्या इस्पितळांत आहों.

वातकफाच्या विकारानें कित्येक दिवस ती बेशुद्ध पडून राहिलेली होती. आतां शुद्धीवर आल्यानंतर ती गतगोष्टींची आठवण करूं लागली. एक एक गोष्ट हळूहळू तिला आठवूं लागली.

पावसाळ्यांतल्या एका रात्रीं तिच्या पातिव्रत्याची शंका घेऊन नवऱ्यानें तिला छेडलं होतें. त्याच्या छळानें टेकीला आलेली, उपासानें थकलेली, देह कोसळलेला, मन अधुरें झालेलें—अशा स्थितींत तो भयंकर आरोप तिला सहन करतां आला नाहीं.

हालअपेष्टा भोगतां भोगतां कित्येक दिवसांपासून ती वेडी व्हायच्या पंथाला लागली होती. जागा झालेला अभिमान, खोट्या आरोपामुळें उत्पन्न झालेला तिटकारा अनावर झाल्यामुळें त्याचें तोंडमुद्धां पहायचें नाहीं असा निश्चय करुन, तिनें संसाराचीं सारीं बंधनें तोडून फोडून टाकलीं होतीं. ती नदींत जीव देण्यासाठीं गेली होती—पण ती मेली नाहीं.

त्यानंतर तापाच्या धुंदींत दुबळ्या मनाचें प्राबल्य होऊन ती जमीदाराच्या नौकेंत जाऊन राहिली—पण अर्ध्या वाटेवरच नदींत उडी घेऊन पोहत पोहत ती तीराला लागली; भिजलें मस्तक आणि भिजलीं वस्त्रें सांवरीत, सारी रात्र ती एकटीच तापानें फणफणत होती. शेवटीं कसाबसा मनाचा हिय्या करुन ती एका गृहस्थाच्या दरवाजाजवळ येऊन पडली तिथेंच झोंपीं गेली.

तिला एवढेंच आठवत होतें. तिला इथें कुणी आणलें, केव्हां आणलें, किती दिवस असें पडून रहावें लागलें, तें कांहींच आठवत नव्हतें.

आणखी एक आठवण होती ती एकाच गोष्टीची. आपण घर सोडून आलेली कुलटा—परपुरुषाच्या आश्रयासाठीं घर सोडून निघालेली एक दुबळी स्त्री!

यापेक्षां जास्त आठवणी आठवायचें सामर्थ्य तिच्याठायीं नव्हतें—तिला तशी इच्छाही होत नव्हती.

हळूहळू तिची प्रकृति सुधारूं लागली. उठून बसून ती थोडी थोडी हिंडूं फिरूं लागली होती. पुढें आपलें काय होईल याचा विचारसुद्धां करायचा नाहीं, असा जिवाचा धडा करुन तिनें निश्चय केला होता. ती जी कांहीं यातना होती ती अणुपरमाणूच्या रूपानें रात्रंदिवस तिच्या अंतरंगाच्या अंतरंगांत जाणवत राहिली होती खरी, पण एकदां जो पडदा पडला त्याचा एक लहानसा कोपरासुद्धां उघडून पहायची कल्पना आली, तर भीतीनें तिचें सर्वांग गार पडे. मस्तकांत झिणझिण्या येऊन मूर्च्छा आल्यासारखें वाटे.

आश्विन महिन्यांतल्या एके दिवशीं सकाळींच पहिल्यानें उल्लेख केलेली ती बाई आली. आतां ती बरी झाली असल्याचें तिनें तिला सांगितलें. यापुढें तिला इथून जाणें भाग होतें.

'ठीक आहे' असें म्हणून विराज उगीच राहिली. ती बाई इस्पितळांतली नोकर होती. या रोग्याला आपलें म्हणायला बहुधा कुणी नाहीं हें तिला कळून चुकलें होतें. ती म्हणाली, "रागाऊं नका बाई, पण मी असं विचारतें, जीं

माणसं तुम्हाला इथं ठेवून गेलीं त्यापैकीं कुणी एकसुद्धां पुनः पहायला आलं नाहीं. तुमच्या नात्यागोत्याचीं नव्हतीं का तीं ?"

विराज म्हणाली, "नाहीं. त्यांना मी जन्मांत कधीं पाहिलं सुद्धां नव्हतं. एके दिवशीं पावसाळ्यांत रात्रीच्या वेळीं त्रिवेणी नदींत मी बुडालें होतें. मला वाटतं, माझी दया येऊन तीं माणसं मला इथं ठेवून गेलीं असावीं."

"असं का ? पाण्यांत बुडाली होतीस का ? तुझं घर कुठं आहे ?"

मामाच्या गांवाचें नांव सांगून विराज म्हणाली, "मी तिकडेच जाईन म्हणतें. तिथं माझ्या नात्याचीं माणसं आहेत."

ती बाई वयस्क होती. विराजच्या गोड स्वभावामुळें तिला तिच्याबद्दल आपुलकी वाटू लागली होती. काकुळतवाणीनें ती म्हणाली, "तर मग तिकडेच जा पोरी. थोडी काळजी घे जा प्रकृतीची. चार दोन दिवसांत साफ बरी होशील."

थोडेसें हंसून विराज म्हणाली, "आतां बरं कसलं व्हायचं बाई ? हा डोळाही बरा व्हायचा नाहीं कीं हा हातही दुरुस्त व्हायचा नाहीं."

आजारी पडल्यानंतर तिचा डावा डोळा गेला होता आणि डावा हातही अधु झाला होता.

त्या बाईच्या डोळ्यांतून टपूटप् आसवें गळूं लागलीं. ती म्हणाली, "तें कांहीं सांगतां यायचं नाहीं पोरी. हेंही बरं होईल कदाचित् !"

दुसऱ्या दिवशीं त्या बाईनें स्वतःचे कांहीं गरम कपडे आणि प्रवासापुरती पैशांची तजवीज करून दिल्यावर विराज जायला निघाली. तिला नमस्कार करून ती बाहेर जायला निघत होती तोंच एकाएकीं मागें वळून म्हणाली, "एकदां माझा चेहरा पाहून घेतें. एक आरसा आहे का ?"

"आहे तर. देतें हं आणून." असें म्हणून आंत जाऊन तिनें एक आरसा आणून तिच्या हातीं दिला.

विराज पुनः परतून जाऊन आपल्या लोखंडी खाटेवर बसली आणि आरसा घेऊन पाहूं लागली. आरशांत जें कांहीं दिसलें तें पाहिल्याबरोबर तिला शिसारी आली. वांकडें तोंड आणखीही वांकडें होऊन गेलें. आरसा फेंकून देऊन बिछान्यांत तोंड खुपसून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

'तें मुंडन केलेलें मस्तक !—आकाश भरून आलेल्या काळ्या कुट्ट मेघासारखे ते भुरभुरते केंस कुठें गेले ? साऱ्या तोंडावर जिकडे तिकडे वण

पडलेले—ते कमलासारखे डोळे कुठं गेले ? ती तापलेल्या सोन्यासारखी उज्जल अंगकांती—कुणी हरण केली ? देवा ! काय ही भयंकर शिक्षा केलीस ? कधीं पुनः भेट झाली तर हें असलं तोंड घेऊन कसं समोर जायचं ? या देहांत त्राण आहे तोंपर्यंत ती भेटीची आशा कांहीं नाहींशी होणार नाहीं. फल्गु नदीच्या पाण्यासारखी खालीं लपून हळूच वाहणारी ती लहानशी आशेची रेषा अजूनही जागी आहे. दयाघना, ती तेवढी लहानशी रेषा सुद्धां पुसून टाकण्यांत तुला काय फायदा झाला ? '

शुद्धीवर आल्यानंतर ती ज्यावेळीं बिछान्यावर पडलेली असे त्यावेळीं नवऱ्याचा चेहरा उजळून उठून तिच्या नजरेसमोर दिसे; त्यावेळीं केव्हां केव्हां तिला वाटे, जें घडलें तें सारें अजाणपणें घडलें—नकळत घडलेल्या या दोषाबदल क्षमा व्हायची नाहीं का ? साऱ्या पापांना प्रायश्चित्तें आहेत—केवळ एवढ्यालाच नाहीं का ? हृदयींच्या देवाला तरी दिसत होतें ना, कीं तिनें पाप केलें नव्हतें ? तरीही, जेवढं पाप चुकून घडलें तें एवढ्या दिवसांच्या पतिसेवेनें धुवून नाहीं का जायचें ?

मधून मधून ती म्हणे, ' ते राग धरून कधींच बसत नाहींत. एकदम जाऊन जर पाय धरले, हृदय उघडून जर सारं कांहीं सांगून टाकलं, तर मग माझ्याकडे पाहून ते काय करतील ? '

ते काय करतील ही कल्पना घेऊन निरनिराळ्या बाजूंनीं, निरनिराळ्या भावनांनीं, ती रंगवून पाहण्याचा प्रयत्न करीत ती सारी रात्र जागत राहिली. डोळ्यांवर झांपड आली तर उठून डोळ्यांना पाणी लावून ती झोंप झाडून टाकी आणि पुनः विचार करायला सुरवात करी.

काय केलंस हें देवा ! तिनें आंखलेलीं हीं विलक्षण चित्रें कां अशीं पायाखालीं तुडवून विद्रूप करून टाकलींस ? आतां नवऱ्याच्या पायांवर डोकें ठेवून कुठल्या तोंडानं डोळे वर करून त्यांच्या तोंडाकडे तिनें पहावें ?

त्या खोलींत आणखी एक रोगी बाई होती. विराज रडते आहे असें पाहून तिनें उठून येऊन प्रश्न केला, " काय झालं ग ? कां रडते आहेस ? "

अरेरे ! विराजच्या रडण्याचें कारण असें दुसऱ्या एका जणाला कळून यावें ना ?

घाईघाईनें डोळे पुसून इकडे तिकडे मुळींच न पाहतां ती हळूहळू तिथून बाहेर पडली.

जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या शब्दानें गजबजलेल्या राजरस्त्याच्या एका बाजूनें त्या दिवशीं ज्यावेळीं ती जाऊं लागली, त्यावेळीं कुठें जावें याची तिला कल्पना नव्हती. तिच्या पायांना चालायची संवय नव्हती. अशा परिस्थितींत कुठें तरी भटकत जावें लागल्यामुळें तिच्या हृदयाला धक्का बसला. तिचें काळीज फोडून एक नुस्कारा बाहेर पडला. ती आपल्याशींच म्हणाली, ' देवा, केलंस तें बरंच केलंस. आतां डोळे मुरडून कुणी पहायचं नाहीं. हा विद्रूप चेहरा, हे डोळे !— अनल्या भटक्या आयुष्याला हेंच योग्य ! "

तिनें घर टाकलें होतें, ती कुलटा झाली हें गांवच्या साऱ्या लोकांना आतां कळून चुकलें होतें. आतां त्या गांवचें तोंड पहाणें, त्या गांवीं असलेल्या नवऱ्याच्या नजरेकडे नजर देणें आतां तिच्यालेखीं निषिद्ध ठरलें होतें. म्हणूनच तिला वाटलें, देवानें तिचा चेहरा असा विद्रूप केला तो केवळ तिच्या कल्याणासाठींच.

रस्ता तोडीत विराज पुढें चालली होती.

## १६

कित्येक दिवस निघून गेले होते.

एका जागीं मोलकरणीचें काम करण्यासाठीं म्हणून ती गेली होती; पण तिच्या थकलेल्या देहाला तें झेंपेना. त्या गृहस्थानें तिला निरोप दिला.

त्या दिवसापासून ती भिक्षा मागून पोट भरीत होती. रस्तोरस्तीं भिक्षा मागायची, कुठें तरी झाडाखालीं रांधून खायचें, आणि तसेंच कुठेंतरी झाडाखालीं निजायचें. तिच्या आजच्या या जीवनांत पूर्वीच्या जीवनाची अणुमात्रही छाया कुठें दिसून येत नव्हती. शंभर ठिकाणीं फाटलेलें वस्त्र—जटा झालेले आंखूड आंखूड केस, कुणाकडून तरी भीक मागून मिळविलेली वाकळ अंगावर घेतलेली—तोच तिचा पूर्वीचा देह, तोच तो वर्ण—सर्व कांहीं पूर्वीं जसें होतें तसेंच होतें. नव्हतें काय तें रूप. सारी पंचवीस वर्षांची उमर—ज्या देहाची तुलना स्वर्गीच्या अप्सरेशीं करायला देखील पूर्वीं सारे भीत होते, त्या जीवनापासून तोडून आणून देवानें तिला अशा नव्या थाटानें पुनः घडवलें होतें !

स्वतःच ती सारें कांहीं विसरली होती. केवळ दोन गोष्टींची तिला विस्मृति झाली नव्हती. ' दे ' म्हणून हात पसरायला तिचा चेहरा गोरामोरा होई. तो शब्द तोंडांतून स्पष्टपणें बाहेर फुटायला फार कठीण जाई.

विस्मरण होत नव्हतें आणखी एका गोष्टीचें—कुठें तरी दूर जाऊन आपल्याला मरावें लागणार. ती मरणाची जागा कुठल्या देशदेशांतराला होती याची तिला कल्पना नव्हती. तेंच देशांतर गांठण्यासाठीं आपल्याला न थांबतां चालावें लागतें आहे, एवढीच जाणीव तिला होती.

असला हा विद्रूप देह घेऊन नवऱ्याच्या समोर जाण्याची कल्पनाच तिला दुःसह होत होती. तिचा अपराध केवढाही मोठा असला तरी तिची अशी दुर्दशा पाहून त्याचें काळीज फुटून गेलें असतें—ही एकच आठवण सारखी जागृत राहिल्यामुळें ती शक्य तितकी त्याच्यापासून दूर दूर जायचा प्रयत्न करीत होती.

एक वर्षभर तिची ही पायपीट सुरू होती; पण तो अजाणता मुक्काम कांहीं तिला सापडेना.

कुठें होता तो ?

हें असलें बेशरम जीवन !—भडकलेलें मस्तक !—कोणत्या भूमीवर टेंकून या कलंकित जीवनाचा शेवट कसा आणि कुठें होणार ?

आज दोन दिवस ती एका झाडाखालीं पडून होती. उठण्याची ताकद तिच्या अंगीं नव्हती. हळूहळू रोगानें पुनः तिला ग्रासलें होतें. खोकला ताप आणि छातींत दुखणें सुरू झालें होतें. भयंकर दुखण्यांत सांपडून दुबळ्या देहानें ती इस्पितळांत गेली होती.

साफ बरी होण्याआधींच ही पायपीट सुरू झाली. केव्हां अर्धपोटीं तर केव्हां उपासपोटीं फिरावें लागे. मूळचा पिंड बळकट होता म्हणूनच हावेळपर्यंत तिनें टिकाव धरला होता. आतां पुढें झेपेलसें तिला वाटेना.

डोळे झांकून ती विचार करीत होती. या झाडाखालींच का तो शेवटचा मुक्काम ? जिवाचें रान करून एवढे देश, एवढे रस्ते, जे पालथे घातले ते याचसाठीं का ? आतां पुनः उठायची आशा नाहींच ना ?

दिवस मावळत आला होता. झाडाच्या उंचांतल्या उंच फांदीवरून मावळत्या सूर्याचीं शेवटचीं किरणें कुठें तरी सरकून गेलीं होतीं. संध्याकाळच्या आरतीच्या घंटाशंखांचे आवाज दूर गांवांतून वाऱ्यावरून येऊन तिच्या कानांवर आदळत होते.

तिच्या झांकल्या डोळ्यांसमोर अपरिचित अशा गृहस्थवधूंची शांत आणि मंगल मूर्ति उभी राहूं लागली. यावेळीं कोण काय करते आहे, कोण कशी

सांजवात लावते आहे, दिवली हातीं घेऊन कोण कशी कशी आणि कुठें कुठें ओवाळत आहे, पदर पसरून कशी कुठें नमस्कार करते आहे, तुळशी वृन्दावनाजवळ निरांजन पेटवून ठेवून देवाजवळ कोणतें मागणें मागते आहे,—सारें कांहीं तिला दिसूं लागलें होतें —कानानीं ऐकूं येऊं लागलें होतें.

आज कितीतरी दिवसांनीं तिच्या डोळयांना पाणी आलें. हजारों हजार वर्षे आज संपून का गेलीं होतीं ? किती हजार वर्षे आपण सांजवात केली नाहीं ? किती हजार वर्षे कुणाचें तरी तोंड डोळयांसमोर आणून देवाच्या पायांजवळ आपण आयुरारोग्य मागितलें नाहीं ?

हे सारे विचार आजवर तिनें जिवापाड दुरावून ठेवले होते.

पण आतां तें अशक्य झालें. सारे निषेध दूर सारून तिचें भुकेलेंतान्हेलें हृदय शंखघंटांच्या आवाजांनीं गृहस्थवधूंच्या अंतरंगांत शिरून उभें राहिलें. प्रत्येक घरदार, प्रत्येक घराचें अंगण, दारींचें तुलसीवृन्दावन, प्रत्येक दिवा-पणती, सारीं कांहीं तिच्या मनश्चक्षूंसमोर उभीं राहून एक होऊन गेलीं. साऱ्याच तिच्या ओळखीच्या चिजा ! प्रत्येकीवर जणूं कांहीं तिच्या हाताचा ठसा उमटलेला !

दुःखाची जाणीव आतां नाहींशी झाली. भूकतहान निवून गेली. रोगाची यातना आतां राहिली नाहीं. मनांतल्या मनांत तन्मय होऊन ती गांवांतल्या गृहिणींच्या सांगातीं फिरूं लागली. त्या स्वैपांकघरांत गेल्या, कीं ही त्यांच्याबरोबर जाई. स्वयंपाक तयार झाला आणि त्या नवऱ्याचें ताट वाढून समोर बसल्या, कीं आपण तिथेंच असल्याचें डोळे झांकल्या झांकल्या तिला दिसून येई. साऱ्या दिवसाचें कामधाम आटोपून मोठ्या रात्रीं झोंपीं गेलेल्या नवऱ्याच्या बिछान्याजवळ कुणीतरी येऊन उभी राहतांच, तीही तशीच जाऊन उभी राही आणि शहारून उठे—

हा तर तिचाच नवरा ! तिची दृष्टि ताठरून जाई. सारखी टक लावून नवऱ्याच्या तोंडाकडे पहात ती सारी रात्र कंठीत असे. काय झालंय हें ? घर टाकून निघाल्यापासून कधीं एका रात्रीं सुद्धां तीं त्याच्यापाशीं गेली नव्हती. आज काय हा भाग्याचा दिवस उगवला ! हा सुखाचा क्षण कसा सहन करायचा ? निद्रेच्या जागृतींत, तंद्रेच्या स्वप्नांत, ही गोड गोड रात्र कशी घालवायची ?

अस्वस्थ होऊन विराज उठून बसली. पूर्वेकडे अजून दिशा उजळूं लागल्या

नव्हत्या. अजूनही झाडाच्या फांदीपानांतून चाळून निघालेलीं, झाडाच्या तळाला पखरलेलीं, चंद्राचीं किरणें जाईजुईच्या फुलांसारखीं जिकडे तिकडे विखुरलीं होतीं.

तिला असा प्रश्न पडला,—आज जर त्याचें असें अचानक दर्शन घडलें तर मग आपण पतिता कशी ? पापाचें प्रायश्चित्त पूर्ण झालें म्हणून का ही सूचना आली कुठून तरी ?

आतां एका क्षणाचाही विलंब करायचा नाहीं असें तिला वाटलें.

दिवस उजाडायची वाट पहात ती सारखी वर डोळे लावून बसली. पुनः भेट होवो कीं न होवो, आतां यापुढें पतीपासून आपल्याला कुणीही दूर ठेवूं शकणार नाहीं असें तिला वाटलें.

मुक्काम गांठणें शक्य असतांना सुद्धां आपण तिकडे पाठ फिरवली, उगीच इतके दिवस आपण पतीपासून दुरावून बसलों, निष्कारण दुःख ओढवून घेतलं, असें तिला वाटलें. आजवर घडलेली या चुकीची जाणीव तिच्या हृदयाला पुनः पुनः भेदून जाऊं लागली. कां कोण जाणे, आज तिला निश्चित वाटूं लागलें होतें, आपला पती आपल्याला हांक मारतो आहे.

जिवाचा धडा करून विराज आपल्याशींच म्हणाली, ‘ खरंच तर ! त्यांच्या परवानगीशिवाय या देहाचा नाश करूं पहात होतें ! त्या या त्यांच्या मालकीच्या देहावर माझी काय सत्ता ? मला काय अधिकार आहे या देहाचं बरं वाईट करायचा ? तें त्यांचं त्यांनीं पहायचं ! जें कांहीं व्हायचं असेल तें त्यांच्याकरवीं होईल ! त्यांच्या पायापाशीं मीं सारं हृदय उघडं करीन आणि मग निरोप घेईन ”

विराज पुनः मागें फिरली.

आज तिला आपला देह हलका झाला असें वाटत होतें. पुढं पडलेलं पाऊल जणूं दगडमातीवर पडत नव्हतें. मन अगदीं भरगच्च होऊन गेलें होतें. कुठें एवढी सुद्धां ग्लानि शिल्लक राहिली नव्हती.

पायपीट करीत असतांना पुनः पुनः एकच गोष्ट तिच्या मनांत येत होती,—आपण केवढी ही चूक केली ! कसल्या भलत्या अभिमानाच्या फासांत स्वतःला अडकावून घेतलें ! हें असलं कुरूप विद्रूप तोंड साऱ्या जगाला दाखवायला जिथं लाज शरम वाटली नाहीं, तिथें तें त्यालाच दाखवायला लाज कां वाटावी ? नवव्या वर्षापासून ब्रह्मदेवानं ज्याचा अधिकार निश्चित करून टाकला, त्याच्यापुढं

सारे गुणदोष उघडे करून दाखवायची आतां कसली लाज बाळगायची ?

## १७

छोटी दादाला एका घडीचा विसावा देत नव्हती. दुर्गापूजेच्या दिवसापासून पौषाच्या अखेरीपर्यंत एकसारखी गांवामागून गांवें, तीर्थामागून तीर्थे, त्याला ओढून नेऊन फिरवीत होती. ती वयानें तरुण, शरीरानें सुदृढ, आणि उत्साहानें अनावर असल्यानें तिच्या पावलावरोबर पाऊल टाकून चालणें थकलेल्या नीलांबरला शक्तिबाहेर होत होतें. तो अगदीं थकून पडला होता. शिवाय कुठें तरी बसून थोडेसे श्रमपरिहार करावे अशी जरी इच्छा त्याला होत नव्हती, तरीही देहाची सारी ओढ घराच्या बाजूकडे रात्रंदिवस त्याला सारखी खेंचीत होती. भारावलेलं मन पुनः गांवीं जाण्यासाठीं अहोरात्र रडत रडत तक्रार करतें आहे असें त्याला प्रत्यक्ष जाणवत होतें.

गांवीं असें काय होतें ? अशा स्वास्थ्यपूर्ण स्थानांत मन कां रमत नव्हतें ?

मोहिनी मधून मधून छोटीला पत्र लिही. त्या पत्रांतही विशेष असें कांहीं नसे. तरीही गांवची जंगली झाडी त्याला ज्या ओढीनें खेंचीत होती तीमुळें दिवसें-दिवस त्याच्या देहाचा सांपळा बनत चालला होता.

पूर्वींचें सारें विसरून जाऊन दादा मुळावर यावा अशी छोटीची इच्छा होती. पूर्वींसारखा तो सदा आनंदी व्हावा, उटल्या सुटल्या गाणीं गावीं, सकारण अकारण पूर्वीप्रमाणेंच पोट भरून त्यानें हंसत रहावें, असें तिला वाटे. पण तिचे सारे प्रयत्न निष्फळ करायचा तिच्या दादानें जणूं चंग बांधला होता. पूर्वीं या बाबीवर तिनें विशेषसें लक्ष दिलें नव्हतें. ती हताश झाली नव्हती. तिला वाटे 'जाऊं दे आणखी दोन दिवस.' पण दोन दिवस म्हणतां म्हणतां चार पांच महिने होऊन गेले तरी कुठेंच कांहीं झालें नाहीं.

घर सोडून निघायच्या दिवशीं मोहिनीच्या उद्गारांमुळें छोटीला विराजवहिनी-बद्दल एक प्रकारची करुणा उत्पन्न झाली होती. मोहिनीच्या शब्दावर तिचा विश्वास बसला नव्हता. दादा बरा झाला असता तर बाळपणच्या गोष्टी ध्यानीं घेऊन कदाचित् तिनें विराज-वहिनीला पूर्णपणें क्षमा केली असती.

वस्तुतः आपल्या वहिनीची आठवण पुनः मायेममतेनें व्हावी, तिला

आपण क्षमा करावी, म्हणून एकेकाळीं ती स्वतः देखील अस्वस्थ झाली होती. पण तो सुयोग येत होता कुठें? दादाची प्रकृति पूर्वीसारखी होत होती कुठें? माणसाला एवढ्या दुःखसंकटांत टाकून कोण असें आड होईल—असें आड येण्याला कोणत्या प्रकारचें दुःख कोणत्या प्रकारें व्हावें लागतें, याची एवढीसुद्धां कल्पना तिला येत नव्हती. वहिनीचा स्वभाव बरा असो कीं वाईट असो, छोटी तो हिशेबांत घेत नव्हती; पण घर सोडून निघून जाण्याचा जो अक्षम्य अपराध तिच्या हातून घडला होता त्यामुळें छोटीच्या मनांत तिच्याबद्दल अत्यंत तिटकारा उत्पन्न झाला होता. असल्या माणसाच्या विरहानें झुरत दादा स्वतःला शिणवून घेतो आहे—त्या दुर्दैवी स्त्रीची आठवण त्याच्या हृदयांत सारखी जागी आहे—हें पाहूनच विराजवरचा तिचा रोष वाढत चालला होता.

एके दिवशीं सकाळीं तोंड वाकडें करून ती आली आणि म्हणाली, "दादा, चल घरीं जाऊं."

नीलांबरला जरा आश्चर्य वाटलें. तो तिच्या तोंडाकडे पहात राहिला. सारा माघ महिना प्रयागांत घालवायचा असें ठरलें होतें तें तिनें कसें बदललें?

दादाला काय वाटलें याची कल्पना येऊन छोटी म्हणाली, "आतां एक दिवस सुद्धां इथं रहायचं नाहीं. उद्यां इथून निघायचं."

एकाएकी ती अशी चिडीला आलेली पाहून नीलांबर उगीच हंसण्याचा प्रयत्न करीत म्हणाला, "काय झालं ग छोटे?"

डोळ्यांतलीं आसवें आवरून धरण्याचा छोटीनं या क्षणापर्यंत जोर केला होता. पण आतां एकदम तिला रडूं कोसळलें.

रडत रडत ती म्हणाली, "आणखी काय व्हायचं? तुला कांहींच बरं वाटत नाहीं. एक एक दिवस तुझी प्रकृति जास्त जास्त थकते आहे. मग कशाला हिंडायचं? नाहीं—यापुढं एक दिवस सुद्धां इथं रहायचं नाहीं!"

मोठ्या ममतेनं तिचा हात धरून, तिला जवळ ओढून बसवून घेऊन नीलांबर म्हणाला, "परतून गेलं म्हणजे बरं होणार आहे थोडंच? आतां ही प्रकृति ठिकाणावर येईल असं मला वाटत नाहीं छोटे! तेव्हां आतां जाऊंच. जें कांहीं व्हायचं असेल तें आतां आपल्या वास्तूंतच होऊं दे."

दादाचें तें भाषण ऐकून छोटीचें रडें अधिकच वाढलें. ती रडत रडत म्हणाली, "सदासर्वदा तिच्यासाठींच एवढा कां झुरतो आहेस? त्यामुळंच ना तुझी प्रकृति ही अशी झाली?"

"कुणी म्हटलं मी तिच्यासाठीं झुरतो आहे म्हणून ?"

छोटीनें तसेंच उत्तर दिलें, "दुसरं कोण सांगणार ? मला स्वतःलाच दिसतंय !"

"तुला नाहीं तिची आठवण येत ?"

छोटीनें डोळे पुसले आणि दांत ओंठ खाऊन उत्तर दिलें, "नाहीं—मुळींच नाहीं. तिची आठवण करणं म्हणजे पाप !"

नीलांबर दचकून म्हणाला, "काय म्हटलंस ?"

"पाप लागेल म्हटलं ! तिचं नांव तोंडीं आलं तर तोंड विटाळेल ! मनीं आणलं तर स्नान करावं लागेल—" बोलतां बोलतां तिची नजर दादाकडे गेली. दादाची मायेची दृष्टि एका क्षणांत बदलून गेली होती.

बहिणीच्या समोर डोळे वटारून नीलांबर कठोर स्वरानें ओरडला, "छोटे !"

त्याची ती हांक ऐकून ती घाबरली. एवढीशी होऊन गेली. दादाची ती लाडकी बहीण, हजार चुका केल्या तरी लहानपणापासून त्यानें तिच्याकडे कधींही असे डोळे वटारून पाहिलें नव्हतें कीं असा करडा आवाज ऐकवला नव्हता, आतां मोठेपणीं दादाच्या तोंडची ही जरबेची भाषा ऐकून तिची मान आपोआप खालीं वांकली.

आणखी एक शब्दसुद्धां न बोलतां जेव्हां नीलांबर निघून गेला तेव्हां डोळ्याला पदर लावून ती फुलून फुलून रडूं लागली. दोन प्रहरीं दादा जेवायला बसला त्यावेळीं त्याच्यासमोर गेली नाहीं. तिसऱ्या प्रहरीं नोकराच्या हातीं खाण्याचे जिन्नस पाठवून ती दाराआड उभी राहिली.

नीलांबरनें तिला हांक मारली नाहीं. तो एक शब्दसुद्धां बोलला नाहीं.

संध्याकाळ होऊन गेली होती. आन्हिक आटोपून नीलांबर आसनावर तसाच उगीच बसून राहिला होता. छोटी हलकेच आंत आली. त्याच्या मागें येऊन गुडघे टेकून तिनें दादाच्या पाठीवर आपलें डोकें टेंकलें. ही तिची पूर्वीची संवय होती. हातून गुन्हा घडला म्हणजे लहानपणीं वहिनीच्या हातचा मार खाऊन अशीच येऊन ती दादाकडे तक्रार करी. ती जुनी आठवण आठवल्यामुळे त्याचे डोळे भरून आले.

तिच्या माथ्यावर हात ठेवून ममताळूपणानें तो उद्गारला, "काय झालं ग ?"

छोटीनें त्याची पाठ सोडली आणि त्याच्या गळीं पडून तशीच कुशींत तोंड खुपसून ती रडं लागली.

तिच्या मस्तकावर हात ठेवून तो उगीच बसून राहिला होता. बराच वेळ असा गेला तेव्हां छोटी रडत रडत म्हणाली, " आतां यापुढं असं बोलायची नाहीं दादा ! "

तिच्या केंसांतून हात फिरवीत फिरवीत नीलांबर म्हणाला, " नाहीं—असं बोलायचं नाहीं ! "

छोटी मुकाट्यानें तशीच पडून राहिली होती. तिच्या मनींची खूण ओळखून नीलांबर शांतपणें म्हणाला, " तुझी वडील माणूस आहे ती. नुसती नात्यानंच नव्हे छोटे—आईसारखं तिनं तुला लहानाचं मोठं केलं—ती आईच होऊन राहिली होती तुझी. इतर लोक काय वाटेल तें म्हणोत पण तुझ्या तोंडून असली भाषा येतां कामा नये. मोठा गुन्हा होईल तो. "

डोळे पुशीत पुशीत छोटी म्हणाली, " कां ती आम्हा सर्वांना अशी टाकून निघून गेली ? "

" ती अशी कां गेली छोटे, तें एक मला ठाऊक आहे कीं एक त्या सर्वसाक्षी भगवंताला ठाऊक आहे. तिला स्वतःलासुद्धां कळलं नसेल ! इतकी ती पागल झाली होती. तिला एवढीशी जरी शुद्ध असती, तर तिनं आत्महत्याच केली असती—असं कांहीं केलं नसतं. "

छोटीनं पुनः एकदां डोळे पुसले. तशाच रडक्या आवाजांत ती म्हणाली, " तर मग अजून ती कां येत नाहीं दादा ? "

" कां येत नाहीं ! यायला तोंड नाहीं म्हणून येत नाहीं पोरी !—" असें म्हणून त्यानें बळेंबळेंच मन आवरून घेतलें आणि नंतर म्हटलें, " ज्या रीतीनं ती मला टाकून गेली, त्या परिस्थितींतून परत यायला जर एवढीशी तरी वाट असती तर ती केव्हांच परत आली असती, एक दिवससुद्धां कुठं राहिली नसती, एवढं सुद्धां तुला कसं कळत नाहीं छोटे ? "

तोंड झांकून घेऊन छोटी म्हणाली, " आतां कळलं दादा—"

नीलांबर उसळून उठून म्हणाला, " आतां ठीक बोललीस पोरी ! तिला यायचं आहे पण येववत नाहीं. ही केवढी भयंकर शिक्षा आहे छोटे, हें तुम्हां लोकांना दिसत नाहीं—पण डोळे झांकले कीं सारं कांहीं माझ्या मनासमोर उभं राहतं तो देखावा बघतां बघतांच मी असा झुरून थकत चाललों आहें ग पोरी—दुसरं कांहीं नाहीं. "

छोटीला एकदम रडें कोसळलें. हातानें डोळे पुसून घेऊन नीलांबर म्हणाला, " जेव्हां तेव्हां ती सांगत असे, कीं दोनच इच्छा आहेत आपल्या—एक इच्छा, मरायच्या वेळीं माझ्या हृदयावर डोकं ठेवून मरायचं ही—अन् दुसरी इच्छा, सीतासावित्रीसारखं होऊन देह ठेवून शेवटीं त्यांच्या पायाशीं जायचं ! बिचारीच्या दोन्ही इच्छा फुकट गेल्या—"

छोटी मुकाट्यानें ऐकत होती.

गहिंवरलेला गळा खांकरून साफ करून घेऊन नीलांबर म्हणाला, " तुम्ही सारीं लोकं तिला दोष देतां. नको म्हणतां येत नाहीं मला, म्हणून मीही उगीच राहतों—पण देवाच्या नजरेपुढं तसं कुणाला फसवतां येतं आहे ? चूक कुणाची आहे हें त्याला तर कळतं आहे ? कुणाच्या दोषाचा बोजा माथीं घेऊन ती अशी बुडाली, हें त्याला तर दिसतंय ? तूंच सांग कुठल्या तोंडानं मी तिला दोष देऊं ? तिला आशीर्वाद द्यायचा नाहीं तर मी करायचं तरी कांय ? नाहीं पोरी, जगाच्या दृष्टीनं ती केवढीही पापी ठरो, मला तिच्याविरुद्ध तक्रार करतां येत नाहीं—तिला नांव ठेवतां येत नाहीं. या जन्मीं माझ्या चुकीमुळं मी तिला हारवून बसलों—ईश्वर करो आणि पुढल्या जन्मीं तरी तिची गांठ पडो !—"

पुढं त्याच्यानें बोलवेना. त्याचा गळा भरून आला. छोटी एकदम उठून बसली आणि आपल्या पदरानें दादाचे डोळे पुसतां पुसतां स्वतःच रडूं लागली.

एकाएकीं तिला वाटलें, आपला दादा आपल्यापासून कुठें तरी दुरावत चालला आहे. तशीच रडत रडत ती म्हणाली, " जिथं कुठं तुला जायचं असेल दादा, तिथं चल. पण यापुढं एक घडीभर सुद्धां तुला मी एकटा ठेवून रहायची नाहीं."

नीलांबरनें वर पाहिलें. तो उगीच थोडासा हंसला.

जगन्नाथाच्या रस्त्यानें विराज पुनः परतून निघाली होती.

पूर्वीं याच रस्त्यानें ती कुठें तरी भटकत मरणाच्या मागें धांवत गेली होती. त्या जाण्यांत आणि आजच्या येण्यांत केवढा फरक !

आतां ती घरीं जायला निघाली होती. रस्ता काटतांना तिचा दुबळा देह विश्रांति घेण्यासाठीं जितका जितका आतुर होई तितकी तितकी ती अधिक

चिडून पुढल्या वाटेला लागे. कांहीं झालें तरी एक क्षणभरही कुठें विलंब लावायची तिची तयारी नव्हती.

साध्या खोकल्याचें रूपांतर आतां क्षयांत झालें होतें, हें तिला कळून चुकलें होतें. म्हणूनच परत जाण्यासाठीं ती एवढी उतावीळ झाली होती. कुणी सांगावें, कदाचित् तोंवर मुक्काम गांठला नाहीं तर !—

लहानपणापासून तिच्या मनाची एक जबरदस्त समजूत होऊन बसली होती ती ही, कीं देह निष्पाप नसला तर पतीच्या पायाशीं मरायचं भाग्य लाभत नाहीं. म्हणून मरायच्यापूर्वीं तो देह तिला पणाला लावायचा होता. प्रायश्चित्त पुरें झालें कीं नाहीं हें तिला पहायचें होतें. ती परीक्षा उतरली तर निर्भय होऊन मोठ्या आनंदानें या जीवनाच्या पैलतीराला जाऊन पतीची वाट पहात बसायची तिची तयारी होती.

पण दामोदर नदीच्या या कांठाला आल्यापासून तिच्या हातापायांना सूज येऊं लागली होती. खोकऱ्यांतून पडणारें रक्त वाढूं लागलें होतें. एक पाऊल पुढें पडणें अशक्य होऊं लागलें होतें.

हताश होऊन तीं परतली आणि एका झाडाखालीं येऊन बसून घाबरीघुबरी होऊन रडूं लागली. असा काय आपल्या हातून भयंकर दोष घडला, कीं एवढें करून सुद्धां शेवटची आशा पुरी होऊं नये? हा जन्म तर गेलाच, दुसऱ्या जन्माची आशा नाहीं, मग आतां करावें काय ?

आशेचा किरण कुठूनही दिसत नव्हता. त्या झाडाखालीं पडल्या पडल्या सारा दिवस हात जोडून ती आपल्या पतिदेवाची प्रार्थना करीत होती.

दुसऱ्या दिवशीं तारकेश्वराच्या जवळपास कुठेंतरी बाजार भरायचा होता. पहाटेपासून तिकडे जाणाऱ्या गाड्यांची रीघ सुरू झाली होती. मनाचा धडा करून तिनें एका म्हाताऱ्या गाडीवाल्याकडे याचना केली. तिच्या डोळ्यांतली आसवें पाहून तो म्हातारा आपल्या गाडींतून तिला तारकेश्वराला पोंचवायला कबूल झाला.

त्या मंदिराच्या आसपास कुठें तरी पडून रहायचें असें विराजनें ठरवलें. इकडले तिकडले पुष्कळ यात्रेकरू तिथें येतात, त्यांतला कुणी तरी गांठून मोहिनीला निरोप पाठवतां येईल असें तिला वाटलें.

रोगानें जर्जर झालेलीं कित्येक माणसें, त्याचप्रमाणें कांहीं ना कांहीं कामना धरून आलेलीं माणसें देवळाला वेढा देऊन इकडेतिकडे पडून राहिलीं होती.

त्यांच्यांत येऊन मिसल्यामुळें आतां विराजला पुष्कळ दिवसांनंतर थोडेंसें समाधान लाभल्येंसें वाटलें. त्यांच्यासारखीच ती व्याधिग्रस्त होती. त्यांच्या सारखीच ती कांहीं कामना धरून आली होती. आतां त्यांच्याप्रमाणेंच आपल्याला इथें मुकाट्यानें पडून राहतां येईल, कोण मुद्दाम आपल्याकडे नजर देणार नाहीं, कुणाच्याही निष्कारण चौकशीला उत्तरें देत बसावें लागणार नाहीं, असें पाहून तिला तेवढेंच दुःखांत सुख वाटलें.

पण तिचा रोग दिवसेंदिवस वाढीला लागला होता. माघ महिन्यांतल्या कडाक्याच्या थंडींत उपासपोटीं तिचे सहा महिने कसेबसे निघाले. पण यापुढें निभाव लागणार नाहीं असें तिला वाटलें. कोण येईल म्हणावें तर तीही आशा नाहीं. एक आशा होती काय ती मरणाची. त्या मरणासाठींच ती आतां तयार होऊं लागली.

त्या दिवशीं आकाशांत आभाळ आलें होतें. तिसरा प्रहर झाला नाहीं तोंच काळोखी येऊं लागली होती. तोंडांतून रक्त पडूं लागल्यामुळें मरणप्राय देह एकदम कोसळून पडूं लागला होता. हीच शेवटची घटका आली आहे असें वाटून ती एव्हांपासूनच देवळाच्या मागल्या बाजूला तोंड खुपसून पडली होती.

दोनप्रहरीं देवाची पूजा उरकली नित्याप्रमाणें उठून बसून आतां आपल्याला देवाला नमस्कार करतां येणार नाहीं असें तिला वाटलें. इतके दिवस पतिदेवाच्या चरणांशीं ती नुसती विनवणी करीत आली होती.

ती अबोध नव्हती. आपल्या हातून जें कांहीं घडलें त्यामुळें या जन्मींचे आपले सारे अधिकार हरवून बसल्याची तिला जाणीव होती. आतां पुढील जन्माचा अधिकार तेवढा गमावूं नये एवढीच तिची इच्छा होती. नकळत अपराध घडला तर त्याची शिक्षा हा जन्म अतिक्रम करून दुसऱ्या जन्मापर्यंत जाऊन पोंहोंचूं नये, एवढीच तिची याचना होती.

पण दिवस जसजसा मावळत आला तसतसा तिच्या विचाराचा प्रवाह एका-एकीं निराळ्याच मार्गाला वाहूं लागला. याचनेची वृत्ती नाहींशी होऊन विद्रोहाची भावना उत्पन्न झाली. सारें अंतःकरण व्यापून टाकून एका अपूर्व अशा अभिमानाच्या सुराचें अनिर्वचनीय माधुर्य तिच्या हृदयांत नादावूं लागलें. त्या नादांत रंगून जाऊन ती आपल्याशींच बरळूं लागली, “ तर मग कां तुम्ही तसं म्हटलंत ? ”

तिचा दुबळा झालेला हात तिला नकळत केव्हांतरी वाटेवर पडून राहिला होता. केव्हां कसा त्याच्यावर कसला तरी जोराचा मार बसला तें तिला कळलें नाहीं. ती तोंडांतल्या तोंडांत विवळत ओरडली.

माणसांच्या जाण्यायेण्याची ती वाट होती. ज्या व्यक्तीनें नकळत तिच्या दुबळ्या हातावर पाय दिला होता ती व्यक्ति अतिशय शरमिंदी होऊन थांबून उभी राहिली आणि काकुळत वाणीनें म्हणाली, " अरेरे ! अशी काय रस्त्यावर आडवी पडली होतीस बाई ? नकळत पाय पडला माझा—फार लागलं नाहीं ना ? "

झटकन् तोंडावरचा पदर दूर करून विराजनें पाहिलें—आणखी एकदां तशीच अस्फुट किंकाळी तिच्या तोंडाबाहेर पडली.

तो नीलांबर होता !

जरा झुकून वर पाहून ती पुनः दूर झाली.

थोड्या वेळानें सूर्य अस्ताला गेला. पश्चिमेच्या आकाशांत आतां मेघ दिसत नव्हते. मेघांचें आवरण फोडून सूर्याचीं सोनेरी किरणें देवळाच्या शिखरावर, झाडांच्या पानांवर झळकत होती. दूर उभें राहून नीलांबरनें छोटीला सांगितलें, " ती पहा कुणी रोगी बाई—तिला माझा चांगलाच धक्का लागला वाटतं. पहा वरं तिला काय देतां येईल तर. कुणी भिकारीण आहे वाटतं."

छोटीनं पाहिलं—ती बाई सारखी तिच्याकडे टक लावून पहात होती. हळूहळू जवळ जाऊन ती उभी राहिली. त्या बाईच्या तोंडावर पदर अर्धवट पडला होता तरीही छोटीला वाटलें, कीं हा चेहरा पूर्वी केव्हां तरी पाहिलेला असावा.

तिनें विचारलं, " तूं कोणत्या गांवची ग बाई ? "

" सातगांवची." असें म्हणून ती बाई हंसली.

तें हंसणें म्हणजे विराजच्या साऱ्या वैभवांतलें मोठें लेणें होतें. तें हंसणें कुणी विसरेल अशी कल्पना करणें चुकीचें होतें.

" अगबाई, वहिनी ! " असें म्हणून छोटी त्या जीर्ण देहावर एकदम कोसळून पडली आणि तोंडांत तोंड घालून रडूं लागली.

दूर उभा असलेला नीलांबर पहात होता. त्यांचें भाषण त्याला ऐकूं आलें नाहीं तरीही त्याला कळून चुकलें—

तो जवळ येऊन उभा राहिला — एकदां नखशिखान्त तिला पाहून घेतल्यावर तो शांतपणें म्हणाला, " इथं रडूं नकोस छोटे—ऊठ."

बहिणीला दूर सारून आपल्या पत्नीचा जो जीर्ण देह एकाद्या पोरासारखा दोन हातानें उचलून घेऊन तो झपाझप पावलें टाकीत मुक्कामाकडे वळला.

* * * *

औषधोपाय करण्यासाठीं कुठल्यातरी चांगल्या हवेच्या ठिकाणीं जाण्यासाठीं विराजला पुष्कळ आग्रह करण्यांत आला पण ती कांहीं केल्या कबूल होईना. यापुढं घर सोडून जाण्याचें तिनें साफ नाकारलें.

छोटीला एका बाजूला घेऊन नीलांबर म्हणाला, "आतां ती थोड्या दिवसांची सोबतीण आहे. आतां तिच्या मर्जीप्रमाणें होऊन जाऊं दे. जिथं रहायचं म्हणते तिथं आतां राहूं दे तिला. जास्त आग्रह करूं नका."

तारकेश्वर स्वामीच्या पायांवर डोकें ठेवून तिनें पहिलें मागणें हेंच मागितलें होतें—एकदां घरीं घेऊन चल. एकदां त्या माझ्या बिछान्यावर मला डोकें टेकूं दे.

आपल्या घराबद्दल, आपल्या घरांतील प्रत्येक जिनसेबद्दल आणि आपल्या पतीबद्दल तिला असा कांहीं भयंकर ओढा उत्पन्न झाला होता, कीं त्या आठ-वर्णीनें झालेली तिची खळबळ पाहून कुणालाही रडूं आलें असतें. दिवसाच्या असो कीं रात्रींच्या असो--बऱ्याचशा वेळांत ती तापाच्या झांपडींत बहुतेक बेशुद्ध होऊन पडलेली असे. जराशी शुद्धीवर येतांच डोळ्यांत प्राण आणून घरांतील प्रत्येक जिन्नस पाहूं लागे.

तिचा बिछाना सोडून नीलांबर सहसा दूर जात नसे, ओलावलेल्या डोळ्यांनीं तो प्रार्थना करीत असे, " आतां शिक्षा पुरे झाली, आतां एकदांची हिला क्षमा कर. परलोकाकडे जिचे डोळे लागले आहेत तिचा इहलोकींच्या वस्तूंवरचा मोह नाहींसा कर."

ती घर टाकून गेली होती; पण घराबद्दल तिचें तें भयंकर आकर्षण पाहून तो मनांतल्या मनांत रोमांचित होई.

* * * *

दोन आठवडे होऊन गेले. कालपासून तिच्या रोगाचें लक्षण विकोपाला जाऊं लागलें होतें. आज सारा दिवस ती सारखी बडबडत होती.

नंतर थोडा वेळ तिचा डोळा लागला होता. संध्याकाळीं तिनें डोळे उघडून पाहिलें—रडतां रडतां केव्हां तरी छोटी तिच्या पायांपाशीं झोंपीं गेली होती. मोहिनी उशापाशीं बसली होती तिच्याकडे पाहून ती म्हणाली, "मोहिनीच ना तूं?"

तिच्या तोंडाजवळ तोंड नेऊन मोहिनी म्हणाली, "होय जाऊबाई, मी मोहिनी."

"छोटी कुठं आहे.?"

पायाकडे बोट दाखवून मोहिनी म्हणाली, "तुझ्या पायांशीं झोंपी गेली आहे."

"ते कुठं आहेत?"

"पलीकडल्या खोलींत आन्हिक करताहेत."

"तर मग मी सुद्धां माझं आन्हिक करतें—" असें म्हणून डोळे झांकून ती मनांतल्या मनांत जप करूं लागली.

थोड्या वेळानें उजवा हात डोक्याला लावून तिनें नमस्कार केला.

त्यानंतर मोहिनीच्या तोंडाकडे कांहीं वेळ न बोलतां टक लावून पहात नंतर ती हळूहळू म्हणाली, "मला वाटतं, आज आतां मी चाललें. पुन्हा अशीच भेट व्हावी, पुनः अशीच तूं जवळ बसलेली दिसावीस—"

विराजची शेवटची घडी जवळ येत चालली आहे हें कालपासून सर्वांनाच कळून चुकलं होतें. तिचें तें भाषण ऐकून मोहिनी तोंड दाबून रडूं लागली.

विराज आतां चांगली शुद्धीवर आली होती. आवाज अगदीं खालीं आणून ती हळूच म्हणाली, "मोहिनी, एकदां सुंद्रीला बोलावून आणशील?"

ओंठ चावून मोहिनी म्हणाली, "आतां ती कशाला हवी जाऊबाई? ती यायची नाहीं."

"येईल ग—येईल ती. एकदां बोलाव तिला. एकदां तिला क्षमा करून आशीर्वाद देऊन जाणार आहें मी. आतां कुणावर माझा राग नाहीं—कुणावर माझा रोषही नाहीं. देवानं मला क्षमा केली, माझ्या पतीच्या पायांशीं पुनः आणून ठेवलं—तेव्हां आतां सर्वांची क्षमा मागून जाणार आहें मी."

रडत रडत मोहिनी म्हणाली, " ही कसली क्षमा जाऊबाई ? निरपराधी जिवाला एवढी मोठी शिक्षा देऊन देखील त्या देवाला पुरेसं वाटलं नाहीं —तुलाही घेऊन जायला बसला आहे तो ! हा एक हात घेऊन गेला पण अशीच लुळीपांगळी म्हणून तुला माझ्यापाशीं त्यांना राहूं दिलं असतं—"

विराज एकदम हसूं लागली.

ती म्हणाली, "काय करणार होतीस हा लोळागोळा घेऊन ? साऱ्या गांवांत बदनामी झालेली—यापुढं जगून राहण्यांत काय फायदा आहे पोरी ? "

मोहिनी जोरजोरानें म्हणाली, " आहे जाऊबाई, आहे. बदनामी कसली ! सारी खोटी बदनामी ! असल्या बदनामीला भीक घालीत नाहीं मी. कांहीं वाटत नाहीं मला त्या बदनामीचं. "

"तुला कांहीं वाटत नाहीं पण मला वाटतं. बदनामी खोटी नव्हे—अगदीं खरी आहे. एवढासा कां होईना—पण जो गुन्हा माझ्याहातून घडला आहे मोहिनी, तेवढं झाल्यावर हिंदू महिलेनं जगून राहणं बरं नव्हे. तूं देवाची दया नाहीं म्हणतेस पण—"

तिचें वाक्य पुरें होण्यापूर्वीच सळसळत्या रडण्याच्या भरांत छोटी ओरडून म्हणाली, " मोठीच दया आहे कीं या देवाची ! "

एवढा वेळ ती मुकाट्यानें रडत होती—नुसती ऐकत होती —आता अनावर झाल्यामुळें ती एकदम अशी ओरडत सुटली. रडत रडत म्हणाली, " एवढी सुद्धां दया नाहीं या देवाला. एवढासुद्धां विचार नाहीं. अस्सल पाप्याला कांहीं झालं नाहीं नि आम्हालाच त्यानं ही अशी जबर शिक्षा दिली ! "

ती रडत असलेली पाहून विराज तोंड दाबून हंसूं लागली. किती सुंदर होतें तें हंसणें !—काळीज फुटून बाहेर आलेलें तें हंसणें !

रागाचा लटका आव आणून ती म्हणाली, " उगी रहा भद्रकपाळे, ओरडूं नकोग. "

एकदम येऊन छोटीनें तिच्या गळयाला मिठी घातली. मोठमोठ्यानें रडत ती म्हणाली, " आम्हाला अशी टाकून जाऊं नकोग वहिनी. सर्वांनाच संकट आहे हें ! तूं औषध घे—आपण कुठं तरी जाऊं —कांहीं उपाय करूं—तुझ्या पाया पडते वहिनी, आणखी चार दिवस तरी जगून रहा. "

छोटीच्या रडण्याचा आवाज ऐकून आन्हिक टाकून नीलांबर धांवत आला आणि ऐकूं लागला. छोटीच्या तोंडचे शब्द घेऊन तोही तिला जगायचा

प्रयत्न करण्याचा उपदेश करूं लागला. त्याचें भाषण एकून विराजच्या दोन्ही डोळ्यांतून आसवांचे मोठमोठाले थेंब गळूं लागले.

मोहिनीनें ते हळूच पुसून टाकले आणि छोटीला हृदयाशीं कवटाळलें.

तिच्या कुशींत तोंड लपवून छोटी फुलून फुलून रडूं लागली त्यामुळें सर्वांनाच रडूं कोसळलें.

कांहीं वेळानें गहिंवरल्या आवाजानें विराज म्हणाली, "रडूं नकोस छोटे—ऐक."

आड राहून नीलांबर ऐकत होता. विराज आतां पूर्णपणें शुद्धीवर आली होती. तिच्या यातना आतां संपत आल्याची त्याला जाणीव झाली होती.

विराज बोलूं लागली, "आपल्याला कळत नाहीं म्हणून देवाला दोष देऊं नकोस छोटे!—अगदीं बारकाईनं विचार करून पहा—त्यानं ही दया कशी दाखवली आहे हें माझ्याखेरीज दुसऱ्या कुणाला कळायचं नाहीं. या मरणांतच मी जगेन—मी गेल्यानंतर तुम्हाला हें पटेल. तूं म्हणतेस एक हात नि एक डोळा काढून घेतला—दोन दिवसांनीं राहिलेलाही जाईल—एवढी मोठी भयंकर शिक्षा त्यानं दिली खरी पण पुनः आपल्या माणसांत आणून मला ठेवलं, हें काय थोडं झालं? हे उपकार विसरून कसं चालेल छोटे?"

"आपल्या माणसांत आणलं आहे डोंबल?" असं म्हणून छोटी रडूं लागली.

देवाची दया—देवाचें धोरण—तिला कांहीच पटत नव्हतें. तिच्या दृष्टीनें हा सारा प्रकार म्हणजे देवाघरचा अविचार, अत्याचार होता.

थोड्या वेळानं विराज म्हणाली, "छोटे, किती वेळ तरी पाहिलं नाहीं ग—तुझ्या दादाला हांक मार ना एकदां."

बाजूला उभा राहिलेला नीलांबर जवळ येतांच मोहिनी बिछाना सोडून बाजूला झाली.

विराजच्या उशाशीं बसून तिचा उजवा हात आपल्या हातीं घेऊन नीलांबर नाडी पाहूं लागला. खरोखरच आतां आशेला कांहीं जागा नव्हती. तापाचा एवढा जोर असतांना ती एवढा वेळ बोलत राहिली—आतां तो जोर ओसरतांच सारें कांहीं थंड पडेल असा अंदाज त्यानें पूर्वींच केला होता. आतां तर त्याची खात्री झाली.

विराज म्हणाली, " चांगली नाडी पारखून घ्या—" असें म्हणून ती हंसली.

अशावेळीं अशी मर्मभेदक थट्टा कशी सुचली तिला ? या पायींच एवढा सारा अनर्थ झाला होता ?

पूर्वीच्या गोष्टी त्या सर्वांना आठवल्या. अंतरींच्या वेदनेनें नीलांबरचा चेहरा खार्कन् उतरला.

तें विराजच्या लक्षांत आलें असावें. तिला वाईट वाटलें. ती म्हणाली, " नाहीं—नाहीं—तसं म्हणत नाहीं मी. अगदीं खरं खरं सांगतें—आतां किती क्षण राहिले आहेत ? " मोठ्या कष्टानें आपलें मस्तक नवऱ्याच्या मांडीवर ठेवीत ती म्हणाली, " आतां सर्वांसमोर एकदां सांगा—मला क्षमा केली म्हणा—"

अगदीं कोरड्या वाणीनें नीलांबर म्हणाला, " क्षमा केली ! "

आपल्या हातानें त्यानें तिचे डोळे पुसले.

क्षणभर डोळे मिटून विराज स्वस्थ राहिली आणि अगदीं हळू आवाजांत म्हणाली, " कळून किंवा नकळत—एवढे दिवस या घरसंसारांत वावरतांना अनेक चुका माझ्या हातून घडल्या आहेत. मोहिनी, तूं ऐक. छोटे, तूंही ऐक पोरी, तें सारं आतां विसरून जा आणि मला निरोप द्या. मी चाललें !—" असें म्हणून हात पुढें करून ती नवऱ्याचें पाय शोधूं लागली.

तिच्या पायाखालची उशी एका बाजूला सरकावून नीलांबरनें आपला पाय तिच्यावर ठेवला.

विराजनें त्याच्या पायाला हात लावून त्याची पदधूली मस्तकीं धारण केली. ती म्हणाली, " साऱ्या हालअपेष्टांचं आज सार्थक झालं. आतां कांहीं व्यंग राहिलं नाहीं. माझा देह निष्पाप झाला. आतां चाललें ! पुढं जाऊन वाट पहातें."

एवढेंच बोलून तिनें पाठ फिरवली आणि त्याच्या मांडीवर मस्तक ठेवून ती तोंडांतल्या तोंडांत म्हणाली, " असेच मला घेऊन बसा. कुठं जाऊं नका."— असें म्हणून ती उगीच राहिली. ती आतां पूर्णपणें थकली होती.

सर्वांचीं तोंडें कोमेजून गेलीं होतीं. रात्रीं बारा वाजल्यापासून तिनें बडबडायला सुरवात केली. नदींत उडी कशी घेतली, इस्पितळांत काय झालें, रस्तोरस्ती फिरतांना काय घडलें, सारें कांहीं ती बोलत होती. त्या साऱ्या बडबडण्यांत एकच वृत्ति प्रामुख्यानें दिसून येत होती ती तिची अतिशय एकाग्र अशी

पतिभक्ती! एक घटकेच्या भ्रमामुळें सतीसाध्वी कशी पोळून निघाली, तीच हकीकत ती बडबडत होती.

या दिवसांत नीलांबरला तिच्यासमोर बसून जेवण करावे लागत होतें. मधूनमधून ती छोटीला हांक मारी, मोहिनीला हांक मारी आणि टाकून बोले.

त्यानंतर पहांटे ही सारी ओरडाओरड थांबून तिला श्वास लागला.

पुनः तिनें पाहिलें नाहीं—पुनः ती एक शब्दही बोलली नाहीं.

नवऱ्याच्या मांडीवर देह ठेवून सूर्योदयासरशीं त्या दुःखी जीवाच्या साऱ्या दुःखांचा शेवट झाला.

